# हृदयशारदा



लेखिका :—

सौ. **कमलाबाई टिळक**, एम्. ए.

प्रिन्सिपॉल, वुइमेन्स कॉलेज, हिंदु युनिव्हर्सिटी, बनारस.

१९३२

# प्रस्तावना

सौ. कमलाबाई टिळक या एम्. ए. असून बनारस हिन्दु विश्व-विद्यालयातील स्त्रियांच्या कॉलेजवर प्रिन्सिपल म्हणून कांहीं वर्षें काम करीत आहेत. त्यांच्या विद्वत्तेच्या जोडीला वाङ्मय विलासात्मक कलाकृति करण्याची त्यांच्यामध्यें हौस आहे व सामर्थ्यहि आहे ही विशेष गोष्ट आहे. त्यांनी लिहिलेल्या हृदयशारदादि ९–१० गोष्टी वांचून माझ्या मनांत त्यांच्याबद्दलचा आदर तर वृद्धिंगत झालाच पण एकंदर स्त्री-जातीबद्दलचाही आदर थोडासा वृद्धिंगत झाला. माझ्या मनांत मूळचाच स्त्रीजातीबद्दल आदर आहे पण मी मनांत म्हणत असें कीं, स्त्री पुरुषांची योग्यता जरी सारखी असली तरी समानता बौद्धिक, कलात्मक, साहसात्मक वगैरे कामगिरीवरून ठरवावयाची नाहीं, तर ती निराळ्याच विचारसरणीने ठरवावयाची आहे. स्त्रियांची शारीरिक शक्ति जशी पुरुषापेक्षां कमी असते त्याप्रमाणेंच त्यांची बौद्धिक वगैरे कामगिरी पाहिली असता त्या पुरुषांपेक्षा हिणकस, कमी सामर्थ्यवान् ठरतील असा मात्र एक विचार माझ्या मनाच्या एका कोंपऱ्यांत दडून लपून असे. ( व अजूनही तो थोडासा दबा धरून आहे व मधून मधून डोकावतोच ! ) कारण उपनिषदांत वर्णिलेल्या मैत्रेयी, गार्गी वगैरे स्त्रिया, राजकारणांतील एलिझाबेद राणी, अहिल्याबाई होळकर वगैरे स्त्रिया, वाङ्मय क्षेत्रा-

तील जॉर्ज इलियट, जेन ऑस्टिन्, जॉर्ज सॅन्ड, मेरी कॉरेली, किंवा आपल्याकडील तोरुदत्त, सरोजनी नायडू, काशीबाई कानीटकर वगैरे वाङ्मयसेविका, आधिभौतिक शास्त्रांतील रेडियमचा शोध लावण्यास पतीला मदत करणारी मादाम क्यूरी, विमान कलेंत नाव मिळविलेली एमी जॉन्सन् ( आतां मिसेस मॉलिसन् ) यांचीं व इतरांचीं नावे आपण कितीजरी घेतली तरी त्यांची गणति करावी लागते व करतां येते यावरूनच स्त्रियांची या बाबतींतील योग्यता कमी ठरते असा विचार मनात आल्याशिवाय रहात नाहीं व तो ठाणे देऊन बसतोच बसतो. या विचारातील दोष व हेत्वाभास मला ठाऊक आहेत पण त्यांची चर्चा करणें सध्या अप्रस्तुत आहे म्हणून त्या मोठ्या विषयाच्या भानगडींत न पडता कांहीं आकस्मिक कारणामुळें अलीकडे सौ. क्षमाबाई राव, सौ. आनंदीबाई शिरके, कु. कृष्णाबाई खरे, कु. कुमुदिनीबाई प्रभावळकर, सौ. कमलाबाई टिळक वगैरेंच्या कांहीं लघुकथा मध्यंतरी विशेष अवकाश न जातां वाचण्याची संधि मिळाली व हें निमित्तकारण होऊन स्त्रियाची योग्यता कमी ठरविणारा जो हेत्वाभासात्मक विचार त्यामध्यें थोडीबहुत चलबिचल झाली व असे वाटूं लागलें कीं, न्यायदृष्ट्या सदोष म्हणून ठाऊक असलेल्या वरील विचाराला मनाच्या कोपऱ्यांतच कां होईना व मधूनमधून आणि चोरून का होईना आपण जो थारा देतो हें अयोग्य आहे. वास्तविक सदर गोष्टींनीं नवीन युक्तिवादाची भर घातली असें नाहीं. तथापि, माझ्या मनांत अलिकडे थोडीशी चलबिचल करण्यास जें निमित्त-

कारण झालें ते सांगितलें एवढेच. वर उल्लेखिलेल्या (विस्मरणामुळे न उल्लेख केलेल्या) लघुकथालेखिकांच्या लघुकथा वाचून माझ्या मनाला मी असा प्रश्न केला की, "इतर बाबतींत कांहींहि असो लघुकथांच्या बाबतींत तरी स्त्रियांची कामगिरी पुरुषांच्या कामगिरीच्या जोडीला न शरमता ठेविता येण्याजोगी किंबहुना (केळकरांच्या कोटीची पुनरावृत्ति करून) 'कांकणभर अधिकच' आहे किंवा नाहीं?" आणि या प्रश्नाचें प्रांजलपणे मनाला उत्तर द्यावें लागलें "होय, आहे, यांत शंकाच नाहीं."

[वादामध्यें शिरण्याची माझी इच्छा नाहीं (व ताकदहि नाहीं); पण हे विचार सुचण्याला सौ. कमलाबाई टिळक यांच्या ज्या गोष्टी निमित्त झाल्या त्या गोष्टींचें थोडेसें दिग्दर्शन करतों व त्या गोष्टी स्वतःची खात्री करून घेण्याकरितां वाचकांनी वाचाव्यात एवढी विनंति करून मग प्रस्तावना थोडक्यांतच संपवितों.]

कमलाबाईंच्या या गोष्टी वाचतांना प्रथम जी गोष्ट ध्यानांत येते ती ही की, त्यांची भाषा साधी व सरळ असून सुंदर आहे,—कित्येक पुरुषांच्या भाषेप्रमाणें त्यांत शाब्दिक किंवा बौद्धिक कोट्यांची कसरत किंवा कोलांट्या उड्या मारण्याचा प्रयत्न नाहीं, विरोधाभासात्मक वाक्यें लिहिण्याकरितां खटपट नाहीं, व अलंकारांनीं दिपवून टाकण्याचा अट्टाहास नाहीं. बऱ्याच पुरुषांची भाषा वाचतांना कोंबडा किंवा मोर आपला पिसारा पसरून जो नाच करतो त्याची आठवण होते व 'हा पहा माझा रंगी बेरंगी पिसारा आणि तो सुंदर आहे

का नाहीं सांगा ' असे जणू काही लेखक–मयूर म्हणत आहेत असें वाटतें. पण कमलाबाईंची व बऱ्याच इतर लेखिकांची भाषा वाच-तांना ( त्याच्या संस्कृत भाषेवरील वगैरे अप्रभुत्वामुळें म्हणा पाहिजे तर ) असा भास होत नाही. तींत सहजसौंदर्य व आकर्षकत्व असते. आता कमलाबाई देखील पुरुषाप्रमाणेंच क्वचित् संस्कृत शब्दमिश्रित भाषा लिहितात, व ' हा फोटो माझ्या सवतीचा होता ' असे न म्हणतां ' हा फोटो माझ्या सपत्नीचा होता ' असे (पान ८० मध्ये) अनेक साध्या वाक्यानंतर आलेले आणि म्हणून कृत्रिम व हास्या-स्पद भासणारें एखादे वाक्य लिहून जातातच! परंतु असलीं वाक्यें क्वचितच दिसून येणारीं.

दुसरी गोष्ट अशी कीं, ह्यांच्या गोष्टींमध्यें अंतर्मुख व बहिर्मुख वृत्तीचा सुंदर मिलाफ झालेला दिसतो. पुरुषांच्या कांहीं गोष्टींत अधिक खोल व गंभीर स्वरूपाची अंतर्मुखता दिसेल व इतर काही गोष्टींत बहिर्विषयग्रहणाची विविधता व व्यापकता दिसेल, पण या दोन्हीं वृत्तींचा सुंदर मिलाफ क्वचित् प्रसंगींच पाहण्यास मिळतो. लहान मुलींना बाहुल्या आवडतात व मुलग्यांना विटीदांडू, फूटबॉल, क्रिकेटची बॅट, वगैरे वस्तु खेळण्याकरिता आवडतात ही साधी नित्याच्या पाहण्यांतली गोष्ट आहे, त्याचप्रमाणे स्त्रियांच्यामधें वात्सल्य-बुद्धि ( Maternal instinct ) सृष्टिनिर्मित आहे हे तत्त्व माझ्या-सारख्यांनी कितीक वेळां विद्यार्थ्यांना मानसशास्त्र शिकविताना सांगितलें असेल. पण ' बाहुल्या ' नावाच्या गोष्टींत कमलाबाईंनीं

या गोष्टी ज्या सुंदर स्वरूपांत मांडल्या आहेत त्या माझ्यासारख्या तर्ककर्कश व पृथक्करणप्रवण माणसाला साधणें कठीण.

लहान मुलींचीं व बायकाचीं वर्णनें तर बायकांनींच करावींत असें या व बायकांच्या इतर गोष्टी वांचून वाटूं लागलें आहे. नाटकांतील स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनींच कराव्यात, नाहीं तर कृत्रिमतेचा व अचरटपणाचा तो तमाशा होतो आणि खरा नाजूकपणा तर दिसतच नाहीं असें कित्येक लोक जे म्हणतात त्याचप्रमाणें स्त्रियाच्या वर्णनाच्या बाबतींतहि मला म्हणावेसें वाटतें. पुरुषाच्या वर्णनात कमळें, चाफेकळी वगैरे फुलांच्या उपमा, रूपकें, कोट्या, कल्पनेच्या भराऱ्या वगैरे मुबलक मिळतील, या चांगल्याहि असतील, पण 'बाहुल्या' या गोष्टींत एका लहान मुलीचें जें वर्णन केलेलें आहे त्यांतील पुढीलप्रमाणें साधी पण यथावर्णनपर वाक्यें पुरुषाच्या भाषेंत सांपडणें कठीण. "नेहमींच्या संवयीप्रमाणे चालूं लागल्यावर डोळ्यांवर येणारे केस हातानें मागें सारण्याचा तिला अत्यंत शोभून दिसणारा भाव तिच्या नकळत हातून होऊन गेला. कांहीं क्षणापूर्वीं असा भाव झाल्यावर आपले केस आज मोकळे नसून गुलाबी क्लिप्स्नीं आपल्या मावशीनें खेंचून ठेविले आहेत असें ध्यानांत येऊन ती ओशाळी होई." (पान १००) त्याचप्रमाणें मैत्रिणीची वेषभूषा कशी केली याचें वर्णन करतांना (पान ६ मधें) "तिच्या कानातील सोन्याच्या बेडौल बुगड्या चांगल्या झांकल्या जातील अशा बेतानें मी तिचीं कर्णाग्रें केसांनीं झांकून टाकलीं."— अशा प्रकारचीं अनुभवप्रेरित वाक्यें पुरुषांच्या वर्णनांत कशी येणार ? असो.

## प्रस्तावना

या गोष्टीत अशीं साधींच वाक्ये व असेंच (उपरोधिक स्वरानें उच्चारलेलें) 'सहजसौदर्य' असेल असे कोणी गालांतल्या गालांत हंसून म्हणेल आणि विचार-गाभीर्याची किंवा विचारात्मक श्रेष्ठ धारिष्टाची किंवा सुसंस्कृत कोमलतेची या पुस्तकात अपेक्षा करण्यांत अर्थ नाहीं असा मनाशीं कोणी कयास बांधील तर तो मात्र त्याचा मोठा भ्रम ठरेल. कारण 'हृदयशारदा' या गोष्टींत आपल्या सौंदर्यानें, पावित्र्यानें व भक्तीनें पतीला आदरणीय झालेली व मूर्तिमंत सत्काव्य-स्वरूप झालेली सहधर्मचारिणी श्रेष्ठ, का पतीच्या काव्याची त्याच्या बरोबर चर्चा करू शकणारी बुद्धिप्रधान पत्नी श्रेष्ठ असा मोठा गभीर स्वरूपाचा प्रश्न उपस्थित केला आहे व त्याची कलाविलासात्मक पद्धतीची सुदर व विचारप्रवर्तक मांडणी केलेली आहे. "प्रेमाच्या वाटा" ही गोष्ट तर पुष्कळाच्या विचाराना धक्काच देईल व अलीकडच्या लेखकांनी तर प्रेमाचे स्तोम माजवून सर्व ताळतत्र सोडलाच आहे, आता बायकांनीं देखील ताळतंत्र सोडण्यास आरभ केला आहे" असे काहीं लोक म्हणू लागतील. कारण या गोष्टींत असे प्रश्न उत्पन्न केले आहेत कीं, एखाद्या स्त्रीचे पतीवर तर प्रेम आहेच, पण दुसऱ्या एखाद्यावरहि निराळ्या स्वरूपाचें पण उत्कट प्रेम आहे, तर अशा स्थितीत ह्या दुसऱ्याला घरीं येऊं द्यावें किंवा नाहीं ? आणि त्याच्यावरील प्रेमाला मनांत थारा द्यावा किवा नाहीं ? या प्रश्नाचे उत्तर 'समजत नाही', 'समजत नाही' असें नायिकेच्या तोंडीं घालून कमलाबाई मोकळ्या झाल्या आहेत. पण विचारी

वाचक मात्र असा मोकळा होऊं शकत नाहीं. गोष्ट वाचून झाल्या-नंतर ( व गोष्टींतील प्रसंगाच्या अस्वाभाविकतेवर मनांत टीका केल्या-नंतर ) तो वरील प्रश्नाचा कसा निर्णय करावा याचा मनांतल्या मनांत ऊहापोह करूं लागतो व असले प्रश्न समाजापुढे मांडण्याचें धैर्य कमलाबाईनीं दाखविले याबद्दल त्यांचें तो कौतुक करतो. विचाराचा व भावनाचा नाजुकपणा पहावयाचा असल्यास ‘ नजर ’ ही गोष्ट वाचावी. एखाद्या सुंदर मुलाला किंवा मुलीला पाहिल्यावर एखाद्याची दृष्ट किंवा वाईट नजर त्याच्यावर पडेल अशी समजूत करून घेणें हा भ्रम आहे. दृष्ट वगैरे कांहीं नाहीं असें ठाऊक असलें तरी सुशिक्षित मातेला आपल्या गोजिरवाण्या मुलावर दृष्ट पडेल अशी भीति वाटते आणि एखादा कटु अनुभव आला असला तर आपलीदेखील दृष्ट मुलाला बाधेल अशी विपरीत भीति तिचा पिच्छा पुरविते अशा प्रकारचें आईचें जें ‘ आधळें खुळें मन ’ त्याचें नाजुक शब्दचित्र ‘ नजर ’ या गोष्टींत काढलेलें आहे. ‘ आत्मदान ’ या गोष्टीत स्वतःचे व्यक्तिमत्व राखूं पहाणाऱ्या आधुनिक युवतीचे कोठें चुकतें आहे हें विचारसूक्ष्मतेचे पृथक्करण करून कलात्मक रीतीनें दाख-विले आहे.

गुणदोषवर्णनपर अधिक विस्तार करतां येईल, पण प्रस्तावना मर्यादेबाहेर जाऊं देणें इष्ट नव्हे. या गोष्टी वाचतांना मला सात्विक आनंद झाला व इतरांनाही होईल अशी मला खात्री वाटते. एवढें

सांगून व कमलाबाईची ‘ हृदयशारदा ’ वाचकांच्या हृदयांतील ‘ हृदयशारदा ’ होवो अशी आशा प्रदर्शित करून ही प्रस्तावना एकदम आटोपती घेतों.

मुंबई,
२ डिसेंबर १९३२. } वा. म. जोशी

# अनुक्रमणिका

# नजर

“एवढी तू विद्वान्, सुशिक्षित, ग्रॅज्युएट् अन् तुझा ह्या नजरेच्या खुळ्या गोष्टीवर विश्वास कसा ?” आश्चर्याने व थट्टेनें हंसत हसत ते मला उद्देशून बोलत होते. मी लज्जेने अधोवदन होऊन माझ्या चिमुकल्याच्या कुरळ्या काळ्याभोर जावळामागे तोंड लपवले. माझ्या डाव्या मुठीत बाळाच्या गळ्यात बांधलेला दृष्टीचा केरवा मणि मी घट्ट दाबून धरलेला होता.

“आणि शिवाय,” ते पुढें बोलूं लागले, “–येथे बाळाला दृष्ट कुणाची लागणार ? आपण गावापासून कितीतरी लांब राहतो. परका माणूस महिन्यामहिन्यात सुद्धा इकडे फिरकत नाही.”

“परका कशाला कोण पाहिजे ?” मी म्हणाले. “आपली आपल्या माणसाला सुद्धा दृष्ट लागते. माझ्या या लाडक्याकडे अष्टौ-प्रहर बघत मी त्याचें कौतुक करीत असते. माझीच याला कशावरून दृष्ट नाहीं लागणार ?”

हें माझे बोलणे ऐकताच चट्कन माझ्या अगदी जवळ येऊन म्हणायचें झाले, “तुझी नजर! लाडके, तुझ्या या प्रेमळ नजरेत दृष्टीच्या दुष्टाव्याचा अणुपरमाणु तरी आढळणे शक्य आहे का? उलट तुझ्या या शांत–स्निग्ध नजरेत सदैव नाहात असलेल्या आपल्या बाळाला कलिकाळाच्या नजरेची सुद्धां भीति नाहीं.” प्रेमाने त्यांनी

माझा हात आपल्या हातात घेतला व ते माझ्या डोळ्यांचा ठाव बघू लागले; पण त्यांच्या नजरेला नजर भिडविण्याचें धाडस मला झालें नाही. पुन्हा मी बाळाच्या कुशींत तोंड लपविलें. माझा त्यांच्या हातांत असलेला हात थरथर कांपू लागला. हा विनय असे माझ्या पतींना वाटले असेल; पण छेः—निरतिशय लज्जेने—शरमेने मी अगदीं ओशाळून गेले होते.

ऑफिसमध्ये जाण्याचे कपडे करताकरतांच हे बोलणे चाललें होते. थोड्याच वेळांत ऑफिसमध्ये जाणे झालें. झोपेला आलेल्या बाळाला पाळण्यात ठेवून मी पाळणा हालवीत बसले. बाळ केव्हांच झोपी गेला. तरी पण मी शून्य हृदयाने पाळणा आंदोलीतच होतें व अंगाईगीत गुणगुणतच होते. कारण या वेळीं बाह्य विषयाकडे माझे लक्ष नसून माझ्या हृदयांत दुसऱ्याच काही विचारांची गर्दी उसळली होती.

* * *

मला पाच वर्षांपूर्वीची माझ्या आयुष्यातील एक चमत्कारिक घटना वारवार स्मरू लागली. तेव्हां मी मॅट्रिक्यलेशनच्या वर्गात होतें. एके दिवशी सायंकाळीं नेहमीप्रमाणे माझ्या प्रिय मैत्रिणीच्या घरीं तिला फिरावयास घेऊन जाण्यासाठी मी गेलेली असताना माझ्या आयुष्यातील त्या नवलपूर्ण पण लाजिरवाण्या प्रसंगाला सुरवात झाली. आमचा रोज संध्याकाळी पर्वतीच्या बाजूला फिरावयास जाण्याचा क्रम कधीही चुकत नसे. पण आज आश्चर्याची गोष्ट म्हणजे मालिनी

आपल्या घरांतच नव्हती. तिच्या धाकट्या भावानें मी तिला बोलावून आणतो म्हणून धाव मारली त्याबरोबर त्याच वाड्यांतल्या दुसऱ्या एका बिऱ्हाडाच्या दारांतून मालू घाईघाईनें बाहेर आली व माझ्या दोन्ही खांद्यांवर हात ठेवून म्हणाली, " गडे मिनू, आज मी फिरायला येणार नाही. "

" तें कां ? " तिच्याकडे न पाहतांच मी अर्धवट उद्गारलें; व ती ज्या घरातून बाहेर पडली होती तिकडे बघू लागले.

" कोण ग, पाहुणे आले आहेत वाटत कोणी या गोखल्यांच्या येथें ? " एक दोन नवीन चेहरे दृष्टीस पडल्यामुळे मी म्हणालें.

" अग हो ! " मालू म्हणाली. " अन् म्हणूनच मी आज फिरायला येणार नाही. आज किनई येथे फार—"

इतक्यात एक मुलगी ' मालूताई, ए मालूताई ' अशा हलक्या आवाजात हांका मारीत हळूच त्या घराच्या एका खिडकींतून डोकावली. ती ओझरती माझ्या नजरेस पडल्याबरोबर त्या घरात जाऊन तिला पूर्णपणें पाहून घ्यावी अशी मला तीव्र इच्छा झाली. त्याचें कारण काय असेल ते असो ! ती मुलगी अप्रतिम सुंदर आहे असा मला भास झाला म्हणून म्हणा किंवा माझ्या दुर्दैवाला माझी निर्दय थट्टा करावयाची होती म्हणून म्हणा, माझी पावलें त्या घराकडे वळूं लागलीं. इतक्यात मालूही म्हणाली, " चल, तूच येतेस तिकडे ? आज तिथं मोठी गंमत होणार आहे. आज किनई ती मुलगी पाहुणी आली आहे ना, तिला पहायला येणार आहेत."

" इश्श ! मग त्यात ग कसली आली आहे गमत ? " मी किंचित् कपाळाला आठ्या घालून म्हटले.

" तर, तर ! " माल नाक--डोळे मुरडीत म्हणाली. " तुला नाहीच वाटायची त्यात गमत ! तू आपल एक स्वयवर ठरवलंस, पण आम्हा सगळयाच्र गरिबाना ती कुठली सोय ? "

मी लाजले व तिची ती थट्टा पुढे चालू नये म्हणून तिचा हात धरला व " बर बाई ! चल, येते मी. ती मुलगी तुला पुन्हा हाका मारतीय्, बघ " असे म्हणत घरात शिरले. ओटी व माजघर ओलांडून आम्ही [illegible] खोलीत शिरलो. तितक्यात ती माझे मन आकर्षून टाकणारी [illegible] पुढे [illegible] व [illegible], आर्जवी आवाजाने म्हणाली, " [illegible], देतेस [illegible] अंबाडा तेवढा चटूकिनी गुंडाळून ? [illegible] केल्या हा गुताच निघत नाहीं मेला. आई तर सारखी हाका मारतीय् का, [illegible] माझ्या हाताशी ये म्हणून. गोखल्यांच्या [illegible] आज अगदीच उठवत [illegible] बघ; म्हणून तर ही सारी धादल."

मालिनी चटूकन् तेथल्या चटईवर बसली व कगव्याने तिचे केंस विचरूं लागली. इतक्यात एक पोक्तशी बाई तेथे आली व त्या मुलीला उद्देशून किन्चित त्राग्रिक आवाजाने म्हणाली, " अग मंगले, अजून नाही कां आटपल तुझ ? अजून वेणीच का चाललीय् ? अग, माझ्या हाताशी तू येणार तरी केव्हा ? प्रभाकरपत त्या मंडळींना आणायला गेले सुद्धा. "

" ही बघ आलेच आई ! न्हालेले केस आहेत, त्यानी जटा काही केल्या निघतच नाहीत. "

" हं, आटप कसं तरी लवकर. "

असे म्हणून त्या घाईघाईनेच निघून गेल्या.

" इश्श, काय तरी बाई !" मालू आंबट तोंड करून म्हणाली. " मी आज कशी तुला छान गौरीसारखी सजवणार होते पण — "

इतक्यात मला एक कल्पना सुचली. एवढा सगळा वेळ मी त्या मुलीच्या सौंदर्याकडे एकटक बघत होते. बघता बघता तिच्या आताच्या वेषात तिचे लावण्य दिसावे तितके खुलून दिसत नाही हेही माझ्या ध्यानात आले. कसा वेष केला म्हणजे ती जास्त सुंदर दिसेल याचा मी उगीचच आपल्याशी विचार करीत होते. ही सुसंधि आयतीच आलेली पाहून मी पुढे झाले व म्हटले, " गडे मालू, आता असं कर, की तू जा हिच्या आईच्या हाताखाली, अन् मी सजवते हिला. काळजी नको हो करायला. तुझ्यापेक्षा काकणभर सरसच मी सजवीन हिला—"

" हो–हो, तर, यात काही शंका आहे की काय बाईसाहेब ! नट्टापट्ट्यांत तुम्ही चतुर असल्याशिवाय का तुमचे भावी पतिराज तुमच्या पायावर लोटांगण घालीत आले ? तर आता किनई असं कर, कीं तुझ्या यजमानांना ज्या दिवशी तू भाळून टाकलस त्या दिवशीं तूं जशी सजली होतीस, तशीच हिला सजव अं. "

" बरं–बरं, पुरे ग तुझा चावटपणा ! तुला काळवेळ काहीं–जा

जा लवकर; नाहीतर त्या पुन्हा हाक मारतील."

मालू गेल्याबरोबर मी मंगलेच्या वेषभूषेच्या तयारीला लागलें. तिच्या लांबच लांब काळ्या कुरळ्या केसांचा पिळाचा छानदार अंबाडा मी तेव्हांच बाधला व माझ्या केंसांतून आंकडे काढून काढून तो तिच्या नाजूक शुभ्र मानेवर ऐटबाज रीतीने सांवरून धरला. तिच्या कानांतील सोन्याच्या बेडौल बुगड्या चांगल्या झांकल्या जातील अशा बेतानें मी तिचीं कर्णाग्रें केसानी झाकून टाकली. बागेत धांव मारून मी पर्णाच्छादित असें एक टपोरे पण नाजूक गुलाबाचें फूल तिच्या अंबाड्यावर किंचित् तिरके खोवले. तिने नेसलेलें टोपपदरी गडद जांभळें इरकली लुगडे मी नापसंत ठरविले व तिच्या लुगड्यांपैकीं बदामी रगाचें बारीक जरी किनारीचें एक तलमसें पातळ तिला पेहेरण्यास सांगितले. त्याला शोभणारा पोलका तिच्यापाशीं नव्हता; म्हणून मालूच्या घरात जाऊन तिच्या आईपासून एक बदामी रंगाचें फॅशनेबल ब्लाउझही आणलें. तिच्या पातळाच्या बारीक बारीक चुण्या खाद्यावर सारून त्या मी माझ्या एका बारीक तीन मोत्यांच्या ब्रूचने एकजीव करून ठेवल्या व शेवटी माझ्या गळ्यांतला नाजूक घडणीचा बारीक सोन्याचा छेडा मी तिच्या गळ्याभोंवतीं सरकवून दिला.

आतां सगळा थाट माझ्या मनाजोगा झाला असें वाटून मी तिच्यापासून किंचित् दूर जाऊन उभी राहिलें व चिकित्सक दृष्टीनें तिच्याकडे पाहूं लागलें. ती बिचारी तिला पूर्णपणें अपरिचित अशा या थाटामाटानें अगदीं भांबावून गेली होती; पण मी अगदींच परकी

व शिवाय तिच्याहून प्रौढ, शिकलेली व फॅशनेबल मुलगी; त्यामुळे तिला माझ्यापुढें कांहीं बोलतां येईना. मी तिच्याकडे अशी टक लावून बघूं लागल्यामुळें तर ती अगदींच लाजली. त्या वेळेला ती किती मनोहर दिसत होती म्हणून सांगूं ! तिच्या अंगोपांगीं मग्ध-मधुर लावण्य नुसतें मुसमुसून राहिलें होतें. त्याला सहज मनोहर अशा पोशाखाचा उठाव मिळाल्यामुळें व त्यांतच तिच्या लाजेच्या गुलाबी रंगाची खुलावट झाल्यामुळें, तिच्या रूपानें मला अगदीं वेड लावून सोडलें. इतक्यांत मालू गडबडीनें आली.

" झालं का मिनू ? अग, ते आले बघ–गाडी दाराशीं उभी राहिली सुद्धां–" असें म्हणत म्हणतच ती खोलींत शिरली व मंगलेला बघून एकदम थबकून उभी राहिली.

" अहाहा! काय ग दृष्ट लागण्याजोगी दिसत आहे ही ! अग, या जहागीरदारांच्याच काय पण राजाच्या राजवाड्याला सुद्धां शोभवणारी पोर आहे बरं ही ! "

" म्हणजे, कोणी जहागीरदार का पाहायला येणार आहेत आज हिला ? " मी विचारलें.

" हो. अग पण, चूप चूप. ते आलेच बघ. " तिनें झटकन दार लोटून घेतलें; दाराच्या फटींतून मी चोरून माजघरांत पाहूं लागले. मालू मंगलेजवळ गेली व " हं, चल आतां बाहेर-चहा दे चल. " असें म्हणून तिला अधिकाधिक लाजवूं लागली. मी दाराच्या फटीतून पाहतां पाहतां एकदम दचकलें. मालू घाईघाईनें दाराजवळ

आली व " पाहूं दे, पाहूं दे मला " म्हणून मला खेंटून उभी राहिली. माझे हृदय धाड्धाड् उडत होते. माजघरात लोडाला टेकून मध्यस्थानी एक पोक्तसा गृहस्थ बसला होता व त्याच्या दोन बाजूंना दोन समवयस्क, गोरे, नीटस व तरतरीत तरुण बसले होते. त्या-एका तरुणाला मी ताबडतोब ओळखले व माझ्या गालावर मंगले-इतकीच दाट गुलाबी छटा चढली.

" नवरामुलगा कुठला ग यांतला ?" मी दबकत दबकत मालीला विचारलें.

"मला नाहीं बाई माहिती" माली उत्तरली. इतक्यांत त्यापैकी एक तरुण गृहस्थ उठला व खोलीच्या दाराजवळ येऊन " मंगले, मंगुताई !" अशा हांका मारूं लागला. तो आल्याबरोबर मी घाबरून पळाले व अगदी खोलीचा कोंपरा गांठला. मालूने मंगलेचा हात धरला व " इश्श, लाजतेस काय अशी ?" असे म्हणत तिला जवळजवळ ओढीतच माजघरांत आणले व आपण तिच्या पाठीशी उभी राहिली. इतक्यात तो मघाशी उठलेला तरूणही आपल्या जागेवर जाऊन बसला. नवरामुलगा म्हणजे तो दुसरा अनोळखी तरुण, याबद्दल आतां मला कांहीं शंका उरली नव्हती. पण तरीही माझ्या छातीत अजून धडधडतच होते. सौंदर्याची केवळ मूसच अशा खालीं मान घालून बसलेल्या मंगलेकडे व तिच्याकडे स्निग्ध नजरेनें टक लावून बघत असलेल्या त्या मी ओळखलेल्या तरुणाकडे मी लक्ष लावून आळीपाळीनें बघत होते. तो पोक्त गृहस्थ मंगलेला कांहीं मामुली प्रश्न

विचारीत होता. मंगला विचारी अगदी घाबरून गेली होती. तो दुसरा अनोळखी तरुण तर तिच्या सौंदर्याने जसा काहीं भारून गेल्यासारखा दिसत होता. इतक्यात माझ्या ओळखीचा तरुण—पण आतां ही लपवालपवी कशाला—स्पष्टच सागते की, तो तरुण म्हणजे माझे भावी पति प्रभाकरपंत होते. याच्यावरूनच "स्वयंवर, स्वयवर" म्हणून मालूने माझी थट्टा केली होती. दादाचा व त्याचा अतिशय स्नेह होता; म्हणून त्यांचे आमच्या घरी पुष्कळच जाणे येणे असे. यामुळे आमची परस्परांशीं चागलीच ओळख झाली होती. त्यानीं माझ्याबद्दल बाबांपाशी मागणी घातली होती व बाबांनी संतोषपूर्वक तिला रुकारही दिला होता. माझी मॅट्रिकची व त्याची एम्. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर आमचा विवाह व्हावयाचा होता. प्रभाकरपंत येथे कसे आले ते मला समजेना व पुढें तर मंगलेशीं अत्यंत सलगीने बोलतांना त्याना पाहून मला आश्चर्यच वाटले. ते म्हणत होते—

"वा मंगले, तू इतकी लाजाळू असशील, हे नव्हतें मला माहीत. जरा वर बघ अन् मोठ्याने, स्पष्ट उत्तरे दे. नेहमी तूच का ती घरांत भाटासारखी बडबडत असतेस ?"

मला कसेंसेच होऊ लागले. "असू द्या असू द्या" तो पोक्त गृहस्थ हंसत हंसत म्हणाला "हा घे तुला खाऊ मुली, अन् आता जा हो तूं बाळ आंत." मंगला खाऊचा पुडा घेऊन चट्कन् आंत आली व थेट स्वयंपाकघरांत गेली. मालूही तिच्या पाठोपाठ गेली. माझे तेथील अस्तित्व

त्या दोघींही बहुतेक विसरल्या असाव्या. मी तेथेंच बसून राहिलें. थोडयाच वेळांत पाहुण्यांचा फराळ झाला व गाडींत बसून ते निघून गेले. मी हळच दाराच्या फटींतून पाहिलें. प्रभाकरपंत त्यांना गाडी-पर्यंत पोंचवून परत घरांत येत होते. मी चट्कन् दार घट्ट लावून घेतलें; पण ते सरळ स्वयंपाकघरांतच शिरले.

" कां प्रभाकरपंत " मगलेची आई बोलत होती, " कसा काय रागरंग ? बाकी काय होणार तें दिसतेंच आहे म्हणा, आम्ही ही आकाशालाच गवसणी घालतो आहों ! "

" छे, छे ! काकू, आकाशाला गवसणी कसली ! येथें नक्की जमणार मगीचें. तुमचा जांवई तर बेटा पाहिला नाहींत कां कसा वेडावून गेला होता तिला पाहून ? अन् हीच काय ती मुलाची अट आहे. बाप काही त्याच्याबाहेर जाणारा नाहीं. मुलगी त्याला सुरेख पाहिजे, बस्स. अन् काकू, मगी आज काय सुरेख दिसते आहे, कल्पना आहे तुम्हांला ? छे बुवा, या वर्षांत ती फारच बदललेली दिसते. गेल्या वर्षी पाहिली तेव्हां नव्हती इतकी दिसत. "

माझ्या हृदयाला हें बोलणे ऐकून कसल्या तरी तीव्र वेदना होऊं लागल्या.

" अहो, छे. बदलली कसली ! " मंगलेची आई म्हणाली. "ही मालूताई अन् तिची कोण मैत्रीण आली होती ती—दोघींनीं मिळून तऱ्हा तऱ्हा करून नटवली आहे तिला, म्हणून दिसती आहे अंमळ नेहमींपेक्षां उठून झालं ! "

खरेंच कां असें असेल ? मग मीं आपल्या हातानेंच आपल्या सुखावर निखारे ठेवलें म्हणावयाचे !

जरा वेळानें मालू व मंगला मी बसलें होतें तेथे आल्या. अर्ध्या तासापूर्वी मोहक भासणारें तें मंगलेचें सौंदर्य आतां मला विषवत् कडू भासूं लागलें. तिच्या त्या निरागस, लालसर मधुर मुद्रेकडे मी एक जहरी कटाक्ष फेंकला व फार संध्याकाळ झाल्याचे निमित्त करून ताबडतोब तेथून पाय काढला.

तेव्हांपासून संशयानें माझ्या हृदयांत ठाणे दिलें. त्यावर प्रभाकरपंत आमच्या घरीं आले. तेव्हां ते नेहमींप्रमाणें माझ्याशीं नीट बोलले नाहींत असा मला भास झाला. आतांशा ते आमच्या घरीं फारच कमी येत. दादा म्हणे त्यांची एम्. ए. ची परीक्षा फार जवळ आली आहे. पण छे ! अशा साध्या कारणाने माझी समजूत कोठून पटणार ? माझा संशय दिवसेंदिवस बळावूं लागला. माझ्या संशयाचा आधार जो मंगलेचा गोड चेहरा त्याचें रात्रंदिवस चिंतन करण्याचें मला जसें कांहीं वेडच लागलें. तिच्या कल्पनामय रम्य मूर्तीवर आपले मत्सरग्रस्त विषारी कटाक्ष फेंकून मी तिला अगदीं जर्जर करून सोडीत असे. शेवटीं एक दिवस मी मालूच्या घरीं गेलें असतांना मंगलेचें लग्न त्या जहागीरदाराच्या मुलाशीं झाल्याची आनंदाची बातमी तिनें मला सांगितली. "मुलगी गरीबाची; पण भारी सुरेख म्हणून त्या थोरामोठ्यांनीं पत्करली अन् त्या दिवशीं तूंच तिला इतकी सजवली होतीस नाहीं का मिनू ? ती व तिची बिचारी विधवा आई तुला

दुवा देत असतील बरं कां !"—

मला खरोखरीच हें लग्न झाल्याचे ऐकून आनंद झाला. पण मत्स-राचें व सशयाचें ठाणे मात्र अद्यापिही माझ्या मनांतून उठलें नाहीं. माझ्या व प्रभाकरपंतांच्या निर्मल मनमिळवणींत एकदां तरी भेद पाडणारी सुंदर कवटाळीण म्हणून अजूनही तिची कल्पनारम्य मूर्ति मनश्चक्षूंपुढे उभी करून मी तिच्यावर आपले विषारी कटाक्ष फेंकीत असे.

⁂ ⁂ ⁂ ⁂

होतां होता याही गोष्टीला एक वर्ष लोटले. मी आतां कॉलेजांत जाऊ लागले होते व प्रभाकरपत सॉलिसिटरचा कोर्स घेऊन मुंबईस राहिले होते. त्यांचा व माझा दोघांचा कोर्स पुरा झाल्यावरच विवाह करावयाचा असे आम्हा दोघाच्या आप्तजनानी ठरविले होतें. याप्रमाणे लौकिकदृष्ट्या जरी आमचीं आयुष्यसूत्रें संलग्न झाली नव्हतीं तरी आमचें स्नेहबंधन मात्र दिवसेंदिवस दृढच होत होतें.

अशीच एक दिवशीं दुपारी मी आपल्या अभ्यासाच्या खोलींत बसून सकाळीं आलेल्या प्रभाकरपंताच्या पत्राचें पारायण चालविलें होतें. वाचतां वाचतां त्यांपैकी एका विशिष्ट भागावर थांबून मी किंचित् चिंतन करू लागले. प्रभाकरपंतानीं लिहिले होतें—

" मिनू, आमच्या गांवची एक बाई आपल्या दुर्दैवी मुलीला घेऊन पुण्यास येऊन राहिली आहे. तिचें बिऱ्हाड तुमच्या घराच्या आसपास जवळच कुठें तरी आहे, अशी माझी कल्पना आहे. माझा

व त्या कुटुंबाचा लहानपणासून फार ऋणानुबंध आहे. ती दुर्दैवी मुलगी माझी बरीच लांबची लांबची बहीणच लागते. निदान मी तरी तिला आपल्या सख्या बहिणीप्रमाणेच मानतो. मुलीचे वडील तिच्या लहानपणींच वारल्यामुळें व तिला दुसरे भावंडही नसल्यामुळे ती व तिची आई अगदीच बिचाऱ्या निराधार झाल्या आहेत. माझ्याकडून होईल तितकी मी त्यांना मदत करतो. त्या बिचाऱ्या निरपराध दुर्दैवी मुलीला तिच्या नवऱ्याने– कसें लिहू तरी मी हे लाजिरवाणें वाक्य !– टाकून दिलें आहे. माझ्या सल्ल्याने ती आता आपलें कांहीं शिक्षण करण्यासाठी पुण्यास येऊन राहिली आहे. मी त्यांना तुझा पत्ता कळविला आहे. त्यांचे असे पुण्यास कुणी नाही. मिनू, त्या तुझ्याकडे आल्या म्हणजे त्या मुलीला सेवासदनात वगैरे घालण्याची व्यवस्था तूं माझ्यासाठीं कृपा करून करशील ? पण मी काय विचारतों आहें हें ! माझी मिनू म्हणजे दयेची देवताच आहे ! अशा एखाद्या अभागी, अनोळखी मुलीला सुद्धा पाहून तिचे कोमल हृदय कळवळेल व ती तिच्यासाठीं आपला प्राणही काढून ठेवील. ”

हे वाचून माझ्या हृदयांत विचारांची गर्दी उसळली. आपल्याविषयीं आपल्या भावी पतीची खात्री पाहून मला आनंदाने गुदगुल्या होत होत्या. त्या बिचाऱ्या मुलीची हकीगत वाचून करुणेनें माझें हृदय हेलकावलें, व यांचा आपण आता कसा शोध काढावा व त्यांना कशी मदत करावी याबद्दल माझ्या मनात विचार घोळूं लागले.

इतक्यांत आमचा रामा गडी आला व दोन बाया तुमच्याकडे

आल्या आहेत म्हणून सांगू लागला. त्या कोण असाव्या याबद्दल आतां मला शंका उरली नव्हती. त्यांना पाठवून द्यायला सांगून मी चट्कन् उठले व खुंटीवरचा गालीचा काढून पसरूं लागलें. त्या दोघीजणी दारांत येऊन उभ्या राहिल्या. मी त्यांच्याकडे नजर टाकली मात्र, मला जणूं आत्यंतिक आश्चर्याचा धक्का बसल्यासारखें झाले. त्यांना ‘ या बसा ’ म्हणण्याचेंसुद्धां मला भान राहिलें नाही. त्या दोघी मला अपरिचित नव्हत्या. त्या मुलीला तर मी ताबडतोब ओळखले; पण ओळखले कसें याचेच मला आश्चर्य वाटलें. ती मुलगी कितीतरी बदलून गेली होती; आणि तिच्यांतला बदल इतका चमत्कारिक होता कीं, मला तिच्याकडे पाहायला एक प्रकारची भीतिच वाटूं लागली. ती तेव्हां कशी दिसत होती याचें बरोबर चित्र आतां माझ्या मनश्चक्षूंपुढें उभें आहे; पण तें शब्दांत उतरणें मात्र शक्य नाहीं.

जिनें आपल्या सौंदर्यानें मला वेड लावून सोडले होतें व नंतर पराकाष्ठेचा मत्सर माझ्या मनांत जागृत केला होता, आणि जिचा महिना दोन महिने माझ्या मनानें अगदीं ध्यास घेतला होता, तीच ती मंगला होती. पण आतां तिचें तें सौंदर्य केवळ स्मृत्यवशेष झालें होतें. तिच्या अंगछबीवरची ती नाजूक व मोहक छटा पार लोपून जाऊन, तिच्यावर एक प्रकारच्या आर्षत्वाचें दडपण पडलें होतें. ती पूर्वीची मोहकता प्रकट होण्यासाठी जणुं काय क्षणोक्षणीं धडपडत आहे असा भास होत होता व त्यामुळें एक प्रकारच्या

कारुण्याची छटा तिच्या अंगोपांगीं वसत होती. तिच्या मुखावरचें पूर्वीचें निरागस अव्याजमनोहरत्व नाहीसें होऊन त्याच्यावर एक प्रकारच्या ओबडधोबडपणाचें सारवण पडलें होतें. त्या रुक्षपणांतून क्षणभर तरी डोकावण्यासाठीं तिचें मूळचे सौंदर्य जणु धडपडत होतें व त्यामुळें तिच्या चेहऱ्यावरही तीच करुणास्पद छटा उमटली होती. याचा अर्थ ती अत्यंत दीन दिसत होती असा मात्र नव्हे; उलट तिच्या मुखचर्येवर संकटातिशयानें येणारें एक प्रकारचें नैष्ठुर्य आलें होतें; पण पाहाणाऱ्याच्या नजरेस मात्र तिच्या अंगोपांगांतील सौंदर्य व सौंदर्याभाव यांचा हा झगडा करुणास्पद भासत होता.

जरा वेळानें मी भानावर आलें व त्याचें आगतस्वागत करणार तोंच मंगलेची आई बोलूं लागली, " आम्ही तुम्हाला परकी भासत असूं, पण तुम्ही आम्हांला परकी वाटत नाहीं बरं. प्रभाकरपंत म्हणजे—"

"हो–हो–" मी एकदम म्हणालें. "मला मुंबईहून आजच पत्र आलं आहे तुमच्याबद्दल. अन् काकू, मी इथें पुण्यांत सुद्धां तुम्हांला पाहिलं आहे कीं एकदां. गेल्या वर्षी तुम्ही अन् मंगला आलां नव्हतां कां गोखल्याच्या येथे ? तेव्हां— "

हे ऐकल्याबरोबर मंगलेला तर माझी ओळख ताबडतोब पटली असें दिसलें. पण माझ्या या बोलण्यानें त्या दोघींच्या आयुष्यांतील दुःखद प्रसंगाची आठवण जागृत झाली असावी. आपण उगीच ती आठवण काढली असें मला झालें. मी त्यांना गालीचावर आणून

बसविले व मुग्धपणे त्या दोघींच्या दुःखित मुद्रेकडे पाहू लागले. जर वेळाने एक जड सुस्कारा टाकून काकू म्हणाल्या, " हऽ मिनूताई आमच्या नशिबानं आम्हाला कसा हात दाखवला आहे, ती हकीकत तुम्हाला ऐकून ठाऊक असेलच ! "

" हो— " मी हळूच उद्गारलें. " मला कळलं सगळं. " त्या खेदकारक हकीकतीची आठवण होऊन व मंगलेची ती दीन दुर्दशा पाहून माझा संताप अनावर झाला व मीं त्वेषाने म्हटले " काकू असल्या रत्नाला झुगारून देऊन तिची अशी दुर्दशा करणारा तो...'

मी आतां कांहीतरी अपशब्द उच्चारणार असे काकूंस खास वाटलं. त्या माझे निवारण करून म्हणाल्या, " नका, मिनूताई, त्या बिचाऱ्याचा काय दोष ? आपलंच नशीव फिरलं, त्याला कोण काय करणार ! खरोखरीच त्यान केवळ पोरीचं रूप पाहून आमच्यासारख्या जन्मदरिद्याना पदरांत घेतलं होतं; व नंतर पोरीचं पालटलेलं रूप पाहून त्यानं तिचा अव्हेर केला, यांत त्याचा काय दोष ? "

"म्हणजे, काकू ?" मी गोंधळून विचारले. "हिचं रूप पालटलं ते कस ? "

"काय सांगू मिनूताई ?" काकू अत्यंत खिन्नपणे म्हणाल्या. " ते त्या दिवशी पोरीला पाहून गेले मात्र; त्याच्या दुसऱ्या दिवसापासूनच पोरीची कळा पालटली. पहिल्यापहिल्यांदा कांहीं एवढं लक्ष्यांत येण्या जोगं नव्हतं; पण दिवसेदिवस पोरगी थोडीथोडी उतरूं लागली अन शेवटी तुम्ही पाहातांना आतां, अशी दशा झाली. ती काय पहिल्यानं

मोठी अप्सरा होती असं म्हणत नाहीं मी; पण खात्रीनें माझी पोर हजारों मुलींत नक्षत्रासारखी चमकत होती. अन्, आतां पाहिलीतना कशी झाली आहे ती! मग जांवयांनीं हिला कां बरं टाकून देऊं नये?"

ही चमत्कारिक हकीकत ऐकून मी अगदीं भांबावून गेलें. माझ्या छातींत धडधडूं लागलें व अंगांत कांपरें भरलें.

"काकू," मी कशीतरी चांचरत म्हणालें, "हें असं कसं झालं हो?"

"कसं म्हणजे काय विचारतां मिनूताई?" बोलतां बोलतां काकूंचा आवाज अधिकाधिक उंच व कठोर होऊं लागला. "माझी खात्री आहे कीं, पोरीला दृष्ट झाली. कोणा मेल्या नष्टाचे डोळे तिला पाहून फुटले अन् त्याची विषारी नजर माझ्या गोजिरवाण्या बाळीला बाधली."

दुसऱ्या कोणीं दुसऱ्या एकाद्या प्रसंगीं जर असें म्हटलें असतें तर मी सुशिक्षित मुलीनें हंसून त्यांची टर उडवली असती. पण आतां मात्र एखाद्या भयंकर अपराध्याप्रमाणें खालीं मान घालून माझ्या हृदयाला जाळून भाजून टाकणारें काकूंचें तें बोलणें मी निमूटपणें ऐकून घेत होतें.

काकूंच्या क्रोधाचें पर्यवसान शेवटीं अश्रूंत झालें व त्या स्फुंदून स्फुंदून रडूं लागल्या. त्याबरोबर इतका वेळ स्तब्ध बसलेली मंगला बोलूं लागली,

"आई, उगीच काय वेड्यासारखं कांहींतरी बोलतेस? अशी नजर लागायला माझं सौंदर्य काय वांयां चाललं होतं? एवढं मात्र

खरं कीं, ती मंडळी मला पाहायला आली होती तेव्हां त्यांच्याच नजरेला कांहीं तरी भुरळ पडली. ” मंगला क्षणभर स्तब्ध बसली. नंतर लगेच माझ्याकडे वळून सद्गदित आवाजानें ती म्हणाली, “ अन् मिनूताई, ती भुरळ तुम्हींच पाडली म्हणायची नाहीं कां ? मिनूताई, रागावूं नका. तुम्हीं केलंत ते सगळं चांगल्या बुद्धीनेंच केलंत पण मला आपलं असं वाटतं कीं–” तिचें दुःख आतां अगदीं अनावर होऊन तिच्या डोळयातून अश्रू वाहूं लागले होते. – “मिनूताई, त्या दिवशीं तुम्हीं जर मला अशी थाटामाटानं सजवली नसती तर मी एव्हांना एकादा सुखासमाधानाचा गरिबीचा संसार थाटला असता. मिनूताई, मला राहून राहून असं वाटायला लागलं आहे की, तुम्ही जर त्या दिवशी आमच्या घरी आला नसता, तर माझ्या आयुष्याचा हा असा खेळखंडोबा झाला नसता—”

मी मनांतल्या मनांत अगदीं चूर होऊन गेलें होते. ती म्हणत होती त्या अर्थाने नाहीं, पण दुसऱ्याच एका अर्थानें तिचें म्हणणें किती तरी खरें होतें ? त्या दिवशी तिच्या घरीं जाऊन तिच्यावर जर आपली विषारी नजर मी फेंकली नसती अन् नंतर महिना दोन महिने तिचा तो दुष्ट ध्यास घेतला नसता तर आज त्या जहागीरदारांच्या घरची सौंदर्यलक्ष्मी आपल्या सोन्याच्या संसारांतून अशी उठली असती कां ?

“ अग, गप–गप; हें काय असं बोलतेस ? ” काकू तिला दाबूं लागल्या. ती तर अगदीं इतक्या वेळचा गंभीरपणा सोडून देऊन

ओक्साबोक्शीं रडत होती. तिच्याकडे पाहून त्यावेळीं माझ्या हृद-याला कसल्या यातना होत असतील बरें ! या वेळीं पंचमहाभूतांपैकीं एखादें भूत कोपून मला आपल्या पोटांत घेईल तर फार बरें असें मला वाटूं लागलें. आमचा तिघींचा हा असा भयंकर मनःक्षोभ झाला असतांना जास्त बोलणें चालणें तें काय होणार ? पुन्हां केव्हां तरी स्वस्थपणें येण्याचें कबूल करून काकू मंगलेला घेऊन गेल्या.

✂ ✂ ✂ ✂

पांच वर्षांपूर्वीचा तो प्रसंग माझ्या डोळयापुढे आज सारखा नाचत होता. " मिनूताई, मला राहून राहून असं वाटतं कीं, तुम्ही त्या दिवशी आमच्या इथे आला नसतां तर माझ्या संसाराचा हा असा खेळखंडोबा झाला नसता." असे निर्भीड पण निर्मळ सत्यमय शब्द उच्चारणारी मंगलेची करुणमूर्ति माझ्या डोळयासमोर वरचेवर उभी राहून माझ्या हृदयाचे पाणी पाणी करीत होती आणि "कोणा मेल्या नष्टाचे डोळे हिला पाहून फुटले, अन् त्याची विषारी नजर या माझ्या गोजिरवाण्या बाळीला बाधली !" असे काकूंचे, त्यांचे हृदय फोडून बाहेर पडणारे व माझा मर्मभेद करणारे कठोर शब्द माझ्या कानांत वरचेवर निनादित होत होते.

आणि—याच माझ्या नजरेची माझे पति आज तोंड भरून स्तुति करीत होते ना ! सख्ख्या बहिणीप्रमाणें मानलेल्या बिचाऱ्या निरागस मंगलेच्या जन्माचें नुकसान माझ्या दुष्ट नजरेनें केलें हें त्यांना समजलें तर माझ्याबद्दल त्यांना काय वाटेल ?

इतका अनुभव आला असतांना नजरेबद्दलची समजूत मला खुळी कशी वाटेल ?— बाळाच्या पायांतला घुंगुरवाळा वाजला अन् मी एकदम माझ्या तंद्रींतून जागृत झालें. बाळाचें गोजिरवाणें रूप मी उघड्यावरच टाकलें आहे असें मला दिसून आलें. मी चट्कन् उठलें अन् पाळण्यावरचा पडदा चोहीकडून घट्ट लावून घेतला.



# ताजमहाल

करुणरसाचा मूर्तिमान् अवतारच अशा या ताजमहालनें आज-पर्यंत किती तरी करुण दृश्यें पाहिलीं असतील; पण त्या दिव-शींचा तो करुण प्रसंग पाहून मात्र त्याचें कुसुमकोमल हृदय अगदीं चुरून गेले असेल.

ताजमहालाच्या अगदीं बाहेरच्या प्रवेशद्वाराशीं एक दीन बालिका उभी होती. तिची पाठ त्या दिव्य प्रेमभवनाकडे वळलेली असून डोळे जमिनीकडे लागले होते. तिच्या डोळ्यांतून ताजमहालाहूनही निष्कलंक अशा अश्रूंचा प्रवाह झरझर चालला होता. तिच्या भोंव-ताली निरुद्योगी उपद्व्याप्यांचा घोळका जमला असून तो तिची नानाप्रकारें कुचेष्टा करण्यांत गुंतला होता. त्यांतलीं कांहीं व्रात्य पोरें तर रस्त्याच्या कडेला पडलेल्या प्रस्तरराशींतून बारीक तांबडे खडे घेऊन ते तिच्याकडे अचुक भिरकावीत होतीं.

इतक्यांत लोकांनीं भराभर बाजूला होऊन वाट केली व एक धीरोदात्त मूर्ति द्रुतगतीनें लोकसमाजांतून येऊन त्या दीनेजवळ येऊन उभी राहिली. तिची ती असहाय अवस्था पाहून त्या महात्म्याचें हृदय कळवळलें.

" अरेरे, कां रडत आहे बरं मुलगी ही ? " तो उद्गारला.

लोकसमूहापैकीं दोघे चौघे पुढें सरसावले व लवून मुजरा करीत एकदम बोलूं लागले,

" सरकार, या भिकारडीला ताजमहाल पहायचा आहे. "

" एवढेंच ना ? " त्यांच्याकडे वळून तो म्हणाला; " मग कां बरें तुम्ही नाहीं जाऊं देत तिला ? "

बालिकेच्या डोळ्यांतील अश्रुप्रवाह क्षणभर विरामला. ती हळूंच पुटपुटली;

" मला एकटीला कसं बरं ताजमहाल पहायला जातां येईल ? "

" अरे, " तो लोकांना उद्देशून हुकमी आवाजांत म्हणाला, " तुमच्यापैकीं एकजण हिच्याबरोबर जा पाहूं."

आपली खाली घातलेली मान तिनें झटक्यासरशीं वर उचलली व त्या घोळक्याकडे एक तिरस्कारपूर्ण कटाक्ष टाकीत ती म्हणाली,

" या अडदांड सोळभोकांबरोबर जाण्यापेक्षां न गेलेलं पुरवलं ! "

हे शब्द ऐकल्याबरोबर त्याच्या आगमनाने किंचित्काल स्तब्ध राहिलेला तो लोकांचा जमाव ताबडतोब खवळला. पहिल्यापेक्षां दुप्पट जोरानें ते तिची हेटाळणी करूं लागले. बालिका भयभीत झाली; त्याच्याकडे तिनें एकवार व्याकुळ नजरेनें पाहिलें. त्याच्या हृदयाला तो कटाक्ष अगदीं भिडला. तो ताबडतोब पुढें झाला व मृदुस्वरानें म्हणाला,

" माझ्याबरोबर येतेस तूं ? "

लोकांच्या आश्चर्याला सीमाच उरली नाहीं. "महाराज-सरकार", त्यांनीं हलकल्लोळ करून सोडला. "या वेडीला, या हडळीला आपण बरोबर नेणार ? "

तो तिच्या अगदीं जवळ गेला व स्निग्ध नजरेनें तिचें मुख न्याहळीत म्हणाला,

" चल माझ्याबरोबर . "

त्या बालिकेचा कृश देह आपादमस्तक रोमांचित झाला.

" आपण—आपण महाराज ? आपण मला आपल्याबरोबर नेणार ? –देवा, मी एवढी भाग्यवान आहें कां रे ? " हर्षातिशयानें ती अगदीं वेडी झाली.

त्यानें हळुवारपणे तिचा हात धरला व तो तिला ताजमहालाकडे घेऊन जाऊं लागला. त्या उदात्त प्रेमस्मारकाच्या अद्‌भुतरम्य दर्शनानें तिची भयलज्जा लवकरच हरपली. जातां जातां अगदीं आंतील गाभाऱ्यांत त्या दोन प्रेमी जीवांच्या समाधीजवळ तीं दोघें येऊन उभीं राहिलीं. तेथील प्रशांत गंभीर वातावरणाची छटा त्यांच्याही अंतःकरणावर उमटली. इतक्यांत त्वरेने तिनें त्याचा हात घट्ट धरला व ती हळूच म्हणाली, —

" आतां इथें घ्यायच्या ना आणाशपथा ? " पण तो कांहीं बोलण्यापूर्वींच ती एकदम मोठ्यानें म्हणाली, —

" नको, इथें नको. ते मेले सगळे इकडेच येताहेत—हां, खरंच कोपऱ्यांतल्या एका मनोऱ्याकडे जाऊं चला. "

ताबडतोब मुख्य इमारतीमधून बाहेर पडून ती एका मनोऱ्याकडे वेगानें जाऊं लागली. तिच्या या मनस्वी वर्तनाचें त्याला अतिशयच आश्चर्य वाटलें. पण त्याचीं पावलें मात्र त्याला नकळत मनोऱ्याकडेच

घळलीं. ती मनोऱ्याजवळ गेली व त्याच्या पायऱ्यांवरून तडातड् उड्या मारीत तिनें केव्हांच त्याचा माथा गांठला. वर पोंचल्याबरोबर तिने हर्षभरानें टाळी वाजवली व ती आपल्याशींच पुटपुटली—

" हं, इथें मात्र छान आहे अगदीं. इथें कांहीं कोणी आम्हाला त्रास द्यायला यायचं नाहीं. "

तो हळुहळू पायऱ्या चढून वर येत होता. शेवटी एकदांचा तो वर पोंचला आणि तिच्याजवळ येऊन तिच्या तोंडाकडे टक लावून पाहू लागला. इतक्या वेळच्या श्रमानें तिचे तोंड अगदीं लाल होऊन गेलें होते. तिचे डोळे तर आनदाने नुसते हिऱ्यासारखे चमकत होते.

मनोऱ्याच्या एका अंगाला ताजमहालाचा हिमधवल घुमट मावळत्या सूर्यप्रकाशात चमकत होता व दुसऱ्या अंगाला काळीसावळी नखरेबाज यमुना तळपत होती. वर्षाऋतूच्या कृपेनें यमुना आतां चांगलीच प्रौढ झाली होती. पण प्रौढत्वाबरोबर येणारें गांभीर्य तिच्या अंगी नितराम् वास करीत नव्हते. तिची मुग्धदशा संपल्याचें मात्र अगदीं उघड दिसत होतें. आपल्या हृदयांत प्रतिबिंबित झालेल्या प्रियमूर्तीचें ती मुग्धपणें चिंतन करीत बसली नव्हती; तर मुग्धेची लज्जा बाजूला सारून ती आपला चंचल हस्तपाश वरचेवर आपल्या प्रियाच्या कंठाभोंवतीं टाकण्यास धडपडत होती.

ही यमुनेची शृंगारक्रीडा तिनें क्षणभर निरखिली. नंतर अत्यंत नाजुकपणें त्याचा हात आपल्या दोन्ही हातांत घेऊन ती आर्जवी स्वरानें म्हणाली—

" गडे, आतां घ्यायच्या ना आणाशपथा ! " सभोंवार विखुर-लेल्या मादक सौंदर्यानें तोही अगदीं भारला गेला होता.

" सुंदर पोरी, " तो उद्गारला " कसल्या ग आणाशपथा ? "

त्याच्या प्रियवचांनी ती आनंदली आणि लाजलीही. लडिवाळ-पणानें त्याच्या कण्ठाभोंवतीं आपला बाहुपाश टाकून त्याच्या विशाल स्कधावर तिने मान टेंकली व लटक्या रुसव्यानें ती म्हणाली,

" जा गडे; अगदीं माहितीच नाहीं ना कांहीं इकडे. अशानें मी कधीं, कधीं—"

त्यानें चमकून तिला लोटल्यासारखें केलें व आश्चर्यपूर्ण स्वरानें तो उद्गारला,

" अरे, ही पोर खरीच तर कुणी वेडी नाहीं ना ! "

त्याच्या त्या शुष्क, कठोर उद्गारानें तिचे हातपाय गळाले आणि मट्कन ती खालीं बसली. अडखळत ती अर्धवट आपल्याशींच बडबडूं लागली.

" असं होतं तर मग कशाला आणली मला बरोबर; अं, कशाला आणली ? "

दुसऱ्याचक्षणीं तिला एकप्रकारचा आवेश चढला. तिनें ताज-महालाकडे हस्तक्षेप केला व ती अस्खलित वाणीनें बोलूं लागली,

" हा ताजमहाल, येथें कशाला उभारला, हें आहे ठाऊक आप-ल्याला ? याची प्रेमावर प्राणप्रतिष्ठा झाली आहे अन् असल्याच स्वर्गीय प्रेमाची अन्यजनांमध्यें प्राणप्रतिष्ठा करणें हें याचें ब्रीद आहे. ज्याच्या

योगानें जीवनाचें सार्थक होतें व जें जीवनांतरींही नष्ट होत नाहीं अशा अमर प्रेमाचें हें दिव्य प्रतीक आहे. निष्प्रेमी जीवाची याच्या पवित्र अंतरंगांत प्रवेश करण्याची छाती होत नाहीं, आणि प्रेमी जीवांनीं एकदां याचें सोज्ज्वळ दर्शन घेतलें म्हणजे त्यांची प्रीतिग्रंथी कलिकालालाही तोडतां येणार नाहीं. "

बोलतां बोलतां ती दमली व आपलें विकल अंग जमिनीवर टाकून स्फुदस्फुंदून रडूं लागली. तिच्या त्या हृदयभेदी हुंदक्यांतूनही वरचेवर ती म्हणत होती; " तुम्हाला जर माझा असा मागून धिक्कार करावयाचा होता, तर आणलंत तरी कशाला तुम्हीं येथें मला."

तिची ती केविलवाणी अवस्था पाहून त्याचें हृदय करुणेनें हेलावलें. एक जड निश्वास टाकून तो म्हणाला,

"अरेरे ! दुर्दैवी बिचारी ! पोरी, तुझ्याकडे लक्ष ठेवायलासुद्धां कुणी मायेचं असं तुला नाहीं कां ग ? "

पण हे अनुकंपेचे उद्गार तिच्या जिव्हारीं झोंबले. तिचे हुंदके ताबडतोब थांबले. आत्यंतिक निराशेनें चवताळल्यासारखी होऊन ती ओरडली,

" जा, जा, येथून ताबडतोब निघून जा. "

तो किंकर्तव्यमूढ झाला.

" आणि तूं ? तूं नाहीं येत माझ्याबरोबर ? " मायेनें तो पुढें झाला व तिला उठवूं लागला. पण तिनें त्याचा हात झिडकारला व ' जा, जा, अगदीं इथें उभे राहूं नका. ' असें पुन्हां एकवार

ओरडून तिनें त्याच्याकडे पाठ फिरविली.

खिन्न हृदयानें तो खालीं उतरला व ताजमहालापासून दूर निघून जाण्यासाठीं बाहेर पडण्याच्या दाराकडे जाऊं लागला. पण त्याचा पाय तेथून निघेना. त्याचें मन ताजमहालाकडेच ओढ घेऊं लागलें. जणूं काय त्याला अत्यंत प्रिय अशी कांहीं वस्तु तेथे विसरून राहिली होती. शून्य हृदयानें व जड पावलानें तो ताजमहालाभोंवतीं भ्रमण करूं लागला.

इतक्यांत लोकांचा एक घोळका त्याच्या जवळून मनोऱ्याकडे जाऊं लागला. त्यांच्या कलकलाटानें तो आपल्या तंद्रीतून जागा झाला.

" कसला आहे हा एवढा गोंधळ " त्यांच्यांपैकीं एकास त्याने कांहींशा कातर स्वरानें प्रश्न केला.

तेवढ्या घाईतही लवून मुजरा करीत तो माणूस म्हणाला, " सरकार, ती वेडी मुलगी नव्हती कां, ती वेडी......"

" हो, मग, काय झालं त्या वेडीचं ? " उतावीळपणें त्यानें प्रश्न केला.

" सरकार, तिनें त्या मनोऱ्यावरून खालीं उडी टाकून जीव दिला "—

त्या माणसानें बोट दाखवलेल्या त्या मनोऱ्याकडे वेड्यासारखा पहात तो क्षणभर उभा राहिला. आपल्या डोळ्यांत उभा राहिलेल अश्रुबिंदु त्यानें झटकन् पुसून काढला व द्रुतगतीनें तो ताजमहाला पासून दूर निघून गेला.

———

# कोंकणी वहाणा

त्या दिवसापासून मंदाकिनीला हणमंतरावांविषयीं एक प्रकारचा तिरस्कार वाटूं लागला.

कोणाचा प्रथम भेटीलाच अनुराग जडतो. पण मंदाकिनीला प्रथम भेटीलाच हणमंतरावांविषयीं अकारण तिरस्कार वाटूं लागला.

अकारण खराच. कारण बिचाऱ्या हणमंतरावांनीं मंदाकिनीचें त्या दिवशीं असें काय मोठें घोडें मारलें होते ? बिचारा सडा फटिंग प्राणी. ना बायको ना बिऱ्हाड; पण थकलेली चार हाडें पसरायला एकादी तरी हक्काची – भाडोत्री हक्काची का होईना, पण हक्काची– चार विती जागा असावी म्हणून पुण्याच्या घाणेरड्या बोळांतून आज चार दिवस वणवण करीत हिंडत होता. फिरतां फिरतां मंदाकिनीच्या वाड्याच्या दिडीवर "खोली भाड्यानें देणें आहे" अशी तिरकी पाटी लावलेली त्याच्या नजरेस पडली. हायसा निश्वास टाकून धिमेपणाने तो दिडींतून वाकून आंत शिरला. आतांपर्यंत प्रत्येक ठिकाणीं "भाड्याने देणे" असलेली जागा मोठी म्हणून निराश होऊन त्याला परत फिरावें लागलें होतें. "यांतली एक खोली देत असलां तर पहा" अशा त्याच्या आशाळभूत विनवणीला "एक खोली नाहीं द्यायची आम्हांला. आम्हांला कुटुंबवत्सल बिऱ्हाड ठेवायचं आहे" अशा कडवट वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या होत्या.

पण इथला मालक एक खोली भाड्यानें द्यायला तयार आहे हें पाहून त्यांच्या जीवांत जीव आला. दिंडी ओलांडल्यावर त्यांना वाड्याचें पुढलें प्रशस्त अंगण लागलें. या अंगणाच्या तीन बाजूस चार चार खोल्यांचे ब्लॉक काढलेले होते. आणखी एक मोठा दर-वाजा ओलांडल्यावर मागलें मोठें अंगण लागे. येथें डाव्या अंगाला विहीर, औदुंबराचा पार व उजव्या अंगाला लहानशी बाग होती. या अंगणाच्या मागल्या बाजूला पांच सहा खोल्या चाळीसारख्या बांधलेल्या होत्या. हणमंतरावांनीं पुढल्या दिडीपाशीं उभे राहून वाड्याच्या मांडणीचें क्षणभर निरीक्षण केलें व आपल्या कोंकणी वहाणाचा ' कर्र् कर्र् ' असा धिमा आवाज काढीत डाव्या बाजूच्या ब्लॉककडे त्यांनीं आपला मोर्चा वळवला. ब्लॉकच्या दारापुढें ते थांबले व आंत पुढेंच कोणी आहे कां हें पहाण्यासाठीं त्यांनीं आंत नजर फेंकली. त्याच वेळीं त्या ब्लॉकमधून मंदाकिनी लगबगीने बाहेर आली व तिने आपला उत्कंठित दृष्टिक्षेप हणमंतरावां-कडे फेंकला.

हीच त्या दोघांची पहिली दृष्टिभेट.

हणमंतरावांकडे नजर गेल्याबरोबर मंदाकिनीच्या चेहऱ्यावरची अनुरागपूर्ण उत्कंठित छटा ताबडतोब मावळली. तिच्या कपाळाला आंठ्या पडल्या. हा प्रकार पाहून हणमंतराव चमकलेच पण धीर धरून त्यांनीं विचारलें.—

" येथें एक खोली भाड्यानें द्यावयाची आहे ना ? "

मंदाकिनीच्या कपाळावरले आंठ्यांचें जाळें जास्तच घट्ट विणलें गेलें. तिनें त्यांच्या पायांकडे, त्या कोऱ्या करकरीत कोकणी वहाणां-कडे, एक तिरस्काराने भरलेला कटु कटाक्ष फेकला व एकाद्या चम-कन् चमकून जाणाऱ्या बिजलीसारखी ती तेथून चटकन् नाहींशी झाली. वीज चमकल्यानंतर आकाशांत जसें गडगडते तसे कांहींसे अस्फुट शब्द मागून हणमंतरावांच्या कानावर पडले. "मला नाहीं माहित" असे ती म्हणाली असें हणमंतरावांना वाटलें. पण खरोखरीनें पाहतां ती म्हणाली होती, " भाड्याने जागा ? अडलंय् माझं खेट्टर तुम्हाला सांगायला !"

हणमंतराव कांहीं वेळ खट्टु झाल्यासारखे उभे राहिले. आणखी चौकशी न करतां परत जावें असेंही त्यांना वाटलें. पण मागल्या अगणाच्या टोकाला असणाऱ्या, सोईस्कर दिसणाऱ्या खोल्या त्याना परत जाऊं देईनात. उजव्या ब्लॉकपुढें जाऊन भीतभीत ते आंत पाहूं लागले. सुदैवानें या ब्लॉकमध्यें खुद्द मालकच रहात होता. त्याचें नुसते " खेट्टर "च नव्हे तर सबंध पोटच भाड्यावर असल्या-मुळें त्यानें सभ्यपणे गोड बोलून आपली जागा हणमंतरावांना दाख-विली. खोली हणमंतरावांना पसंत पडली व हा साधासिधा दिसणारा भाडेकरीही मालकाला पसंत पडला. भाड्याबद्दल बोलणे झालें व हणमंतरावांनीं आपले कुलूप आपल्या खोलीला ठोकलें.

दुसऱ्या दिवशीं बरोबर त्याच वेळेला आपली जुनी मोडकळीला आलेली ट्रंक व तसाच एक बिछाना एका हमालाच्या डोक्यावर

देऊन हणमंतरावानीं मंदाकिनीच्या वाडयाच्या दिंडींतून मोठ्या थाटानें प्रवेश केला. आपल्या वहाणांचा कालच्यापेक्षांही धिमा व गंभीर "कर्र् कर्र् कर्र्" असा आवाज करीत ते आपल्या खोलीच्या रोखानें सरळ निघाले. जातां जाता सहजच डाव्या ब्लॉकच्या दाराकडे त्यांचें लक्ष गेलें. खोलीवरून कांहीशा ऐटीने ते पुढें सटकणार तोंच काय आश्चर्य ! काल त्यांच्याकडे हेटाळणीनें पाहून गेलेली मंदाकिनी कालच्याच पहिल्या प्रेमळ व उत्कंठित मुद्रेने लगबग पुढें आली. पुन्हां कालचाच चमत्कार ! हणमतरावांच्याकडे नजर गेल्याबरोबर तिच्या कपाळावर शेकडों आठ्या पडल्या. त्यांच्या वहाणांकडे तिने तिरस्कारपूर्ण नजरेनें पाहिले. वाडयाच्या दिंडीतून मोठ्या श्रमानें येणाऱ्या, आपल्या लाल जिभेनें खालचा काळा ओठ चाटीत असलेल्या हमालाकडे पाहून तर तिचा संताप अधिकच वाढलेला दिसला व तिरसटल्यासारखें एकवार हणमतरावाकडे पाहून ती झणकाऱ्यानें तेथून चालती झाली.

बिचारे हणमंतराव हा प्रकार पाहून जागच्या जागीच सर्द झाले. या वाड्यात भुताटकी तर नाहीं ना ? कां या मुलीचे माथें फिरलें आहे ? रहावें कां या वाड्यांत कां ठोकावा दुरूनच नमस्कार असल्या चमत्कारिक वास्तूला ? हणमंतरावाचा हमाल धापा टाकीत अगदी त्याच्याजवळ आला. त्याच्या उष्ण निश्वासानेंच कीं काय, हणमंतरावाचा क्षणभर सर्दावलेला मेंदू ताबडतोब काम करूं लागला. आठ आणे खण भाड्याची, बेताची दोन खणी, स्वतंत्र, शांत, विहीर

नळ दोन्ही वाड्यांत–अशी सुंदर जागा काय चौदा पंधरा वर्षांच्या एका चिमुरड्या पोरीला भिऊन सोडायची? भलतेंच एखादे. असा वेडगळ विचार आपल्या डोक्यांत आला तरी कसा? हणमंतरावांच्या रुंद, खप्पड, काळ्या चेहेऱ्यावर स्मित पसरून तो जास्तच रुंद व भीषण दिसूं लागला. ते जास्तच जोरानें कर्र् कर्र् करीत पुढें गेले व मोठ्या अभिमानानें त्यांनीं आपली खोली उघडली. "अरे ए" अधिकारपूर्ण वाणीनें ते म्हणाले, "आण एथें ट्रंक, हळुं हळुं, जपून वांक जरा, हळूं ठेव, ट्रंकेंत काचेचं सामान आहे बरं–हा गद्ध्या,–" बिचारा हमाल वरमला. त्याच्या हातांतून ट्रंक जरा जोरानें खालीं पडली खरीच व ती पडल्याबरोबर खळ्कन् ट्रंकेंत आवाज झाला खराच. हणमंतरावांनीं दिलेला एकच आणा त्यानें कुरकुर न करतां घेतला व तो तेथून हळूंच सटकला. त्याला बिचाऱ्याला काय ठाऊक कीं हणमंतरावांचें काचेचें सामान म्हणजे एक पारा मधूनमधून नाहींसा झालेला आरसा व एक कपबशी एवढेंच होतें म्हणून!

हणमंतरावांनीं दार लावून घेतलें व आपल्या बिछान्यांत गुंडाळून ठेवलेली केरसुणी काढून ते खोलीची साफसुफी करूं लागले. नंतर त्यांनीं दार उघडलें व ट्रंकेंतून बाहेर काढलेल्या सामानानें आपली खोली सजवण्यांत ते गढून गेले.

दुसऱ्या दिवशीं ऑफिसांतून परत येतांना हणमंतरावांचीं पाउलें किती झपाझप उचलत होतीं! आज त्यांना आपल्या दूरच्या नाते-वाइकाकडे आशाळभूतासारखें जावयाचें नसून आपल्या हक्काच्या

खोलीकडे जावयाचे होतें. या गोड विचाराच्या तंद्रींत व आपल्या वहाणांच्या कर्र् कर्र् अशा तालावर चालतां चालतां घराशीं केव्हां आलों व दिंडींतून केव्हां शिरलों याचें हणमंतरावांना भानच राहिलें नाहीं. डाव्या ब्लॉकच्या दाराशीं मंदाकिनीचा उत्कंठित चेहरा दिस- तांच ते आपल्या तंद्रींतून जागृत झाले. पण कालप्रमाणेंच मंदाकि- नीनें तावडतोब कपाळाला आंठ्या घातल्या व त्यांच्या वहाणांकडे तिरस्कारानें पाहून ती नाहींशी झाली. बिचाऱ्या हणमंतरावांची गोड तंद्री व उत्साह जागच्या जागीं विरून गेला.

दुसऱ्या दिवशीं रविवारच्या सुट्टीचा दिवस हणमंतरावांनीं या कोड्याचा उलगडा करण्याकडे घालवला. पण डोकें दुखेपर्यंत खाज- वूनही त्यांना या चमत्काराचा अर्थ समजला नाहीं.

कसा समजणार ? खोलींत डोकें खाजविण्यापेक्षां जर हणमंतराव वाड्यांत जरा इकडे तिकडे फिरते, एकाद्या बिऱ्हाडांतल्या माणसांशीं दोस्ती जमवून मंदाकिनीबद्दल आडून आडून चौकशी करते तर, यांना कदाचित् कांहीं बोध झाला असता !

कारण, ते झालें होतें असें—

मंदाकिनीचें लग्न ठरलें होतें. मंदाकिनीचा भावी पती तिच्या भावाचा वर्गबंधु व परम दोस्त होता. आईबापांनीं आणि भावानें ठरवलेलें तें लग्न, तो कांहीं प्रीतिविवाह नव्हता, पण मंदाकिनीच्या मुग्ध हृदयांत प्रीतीचें बीज वाङ्निश्चयाबरोबरच पेरलें गेलें व तिच्या हृदयांतील ती नाजुक प्रीतिलता दिवसेंदिवस वृद्धिंगत होत होती.

आणखी एक वर्षाने भावी जावईबोवांची एल्एल्. बी. ची परीक्षा उतरल्यावर मंदाकिनीचा विवाह होणार होता. मंदाकिनीचे भावी पतिराज मूळचे खुद्द कोंकणांतले. त्यांचा जमीनजुमला, घरदार वगैरे सर्व कोंकणांत होतें. पण शिक्षणासाठीं ते पुण्यांत आपल्या बहिणी-कडे राहिले होते. मंदाकिनीच्या दादाकडे त्याचें बरेच जाणें येणें असे. लग्न ठरल्यावर तर तें जास्तच वाढलें. मेहुण्याच्या बेसुमार थट्टेला दाद न देतां दोन दिवसांआड तरी ते त्याच्याकडे खेप टाकी-तच. कारण मंदाकिनीच्या आईनें बळेंच तिच्याबरोबर पाठविलेला व मदाकिनीने लाजत मुरकत आणलेला चहा फराळ आणि आल्या-बरोबर दारांतच होणारे तिचे ओझरतें दर्शन याची त्याना भारीच चटक लागली होती.

मंदाकिनीची अवस्था तर कांहीं विचारायलाच नको. गोपाळराव येण्याचा साधारणपणें दिवस असला कीं, तिचे कान चारी प्रहर वाड्याच्या दिंडीकडे असत. गोपाळराव आल्याचे सर्वांच्या आधीं तिच्या प्रथम लक्षांत येई. कारण गोपाळरावाच्या कोकणी वहाणांचा “ कर्र् कर्र् कर्र् ” आवाज तिच्या कानांस अगदीं पाठ झाला होता. तिच्या वाडयात दुसऱ्या कोणाच्याच अशा कोंकणी वहाणा नव्हत्या; त्यामुळें तो विशिष्ट आवाज कानांवर पडतांच तिचें अंग हर्षानें थरारे व हातांतलें काम अर्धेंच सोडून ती खोलीच्या दाराशीं येई. अर्थात् तिचें पाऊल तिथें फार वेळ टिकणें शक्यच नव्हतें. दारांतून अर्धवट डोकावून आपल्या हृदयेश्वराचा मुखचंद्र ती ओझरता न्याहाळी.

गोपाळरावांचें पाऊल खोलीच्या दारांत पडतें न पडतें तोंच मंदाकिनी पार न्हाणीघरांत कपबशा विसळीत असायची.

ज्या दिवशीं हणमंतरावांनीं प्रथमच त्या वाड्यांत पाऊल घातलें, त्या दिवशीं मंदाकिनीचें कान फारच उत्कंठेनें दरवाजाकडे लागले होते. कारण दिवाळीच्या सुट्टींत घरीं गेलेले गोपाळराव एक दोन दिवसांत यावयाचे होते. अर्थातच तो परिचित व तिला अत्यंत मंजुळ वाटणारा ' कर्र कर्र् ' आवाज होतांच ती लगबगीनें उठून बाहेर आली. नेहमीपेक्षां जास्त धिटाई करून तो आवाज अगदीं दाराशीं येईपर्यंत त्या दिवशीं ती थांबली होती. शेवटीं मनाचा धडा करून आपल्या पतिदेवाचा चेहरा डोळे भरून पाहून घेण्यासाठीं ती वर नजर उचलते तों काय ! तिला अगदीं अपरिचित असणारा, खप्पड, कुरूप असा एक परक्या पुरुषाचा चेहरा. मग निराशेनें वेडी होऊन हणमंतरावांकडे व त्यांच्या त्या फसव्या दुष्ट वहाणांकडे तिनें तिरस्कारानें पाहिलें, यांत आश्चर्य ते काय ?

लागोपाठ दोन दिवस असेंच झालें. वहाणांचा आवाज ऐकतांच गोपाळराव आले असे समजून तिनें उत्सुकतेनें पुढें व्हावें व हणमंतरावांचें अप्रिय दर्शन घडतांच त्यांच्याकडे तिरस्कारानें व संतापानें पाहून चालतें व्हावें. आपली अशी चमत्कारिक अवस्था करणारा हा माणूस आपल्या वाड्यांत कायमचा भाडेकरी म्हणून राहिलेला पाहून तर तिच्या अंगाचा अगदीं संताप झाला. पण काय करते बिचारी !

शेवटीं गोपाळराव यायचे तेव्हां आले. दिवाळीच्या फराळाचा

थाट उडाला. मंदाकिनीला पुष्कळसें लाजायला मुरकायला मिळालें व दाराच्या फटींतून कोणाच्या न कळत पतिराजांकडे पुष्कळसें पहायलाहि मिळालें. मंदाकिनीचा अंतरात्मा हर्षोत्फुल्ल झाला. पण तिच्या मनांतला हणमतरावांविषयींचा राग मात्र गेला नाहीं. उलट या प्रसगी तो जास्तच वाढला. कारण जेव्हां गोपाळराव दिवाळीची सुट्टी संपल्यावर आपल्या नव्या वहाणा कर्‌ कर्‌ वाजवीत आपल्या भावी सासुरवाडीस खरोखरीं आले तेव्हां मंदाकिनी त्यांचे स्वागत करण्यास दारामागें हजर नव्हती. कारण दोन तीन वेळां फजिती झालेली असल्यामुळें वहाणांचा आवाज नीट ऐकूनहि ती स्वतःशीं म्हणाली होती, "मी नाही वेड्यासारखी जायची आतां. असेल मेला तो खापरतोड्या" आणि जरा वेळाने पहाते तो काय! तिच्या दादाची खोली मेहुण्यामेहुण्यांच्या थट्टामस्करीनें व हंशाने नुसती हादरत होती! महिन्यानंतरच्या भेटीचा तो 'नवनवल नयनोत्सव' कशामुळें अंतरला तिचा ?–त्या नव्या भाडेकऱ्यामुळे!

आतांशा असें वरचेवर होऊं लागले. कधीं कधीं गोपाळराव खरोखरीचे आले असतांनासुद्धां हणमंतरावांचें अप्रिय दर्शन टाळण्यासाठीं तिनें जाण्याचा कंटाळा करावा; तर कधीं गेल्या वेळचें अंतरलेलें दर्शन आठवून आवाज ऐकतांच दारांत हजर रहावें व हणमंतरावांचा भित्रा चेहरा पाहून त्यांच्यावर मनांतल्या मनांत जळफळावें. याप्रमाणें दिवसेंदिवस मंदाकिनीच्या मनांतला हणमंतरावांविषयींचा तिरस्कार वृद्धिगत होत होता व बिचारे हणमंतराव

आपल्या मनांतल्या मनांत दिवसेंदिवस अगदीं विचारांत चूर होऊन जात होते. काय कारणाने ही बाहेरून सुंदर व गोड दिसणारी मुलगी आपला तिरस्कार करते हें त्यांच्या अजूनही ध्यानांत आलें नव्हतें. गरीब बिचारे हणमंतराव! जन्मापासून हात धुऊन पाठीस लागलेल्या अठरा विश्वे दारिद्र्यामुळें एकाद्या स्त्रीचें नशिब आपल्या नशिबाशीं जोडून तिच्या प्रेमाचा हक्काने उपभोग घेण्याचें त्यांच्या ललाटीं लिहिलेलें नव्हतेंच. याबद्दल त्यानी मागे कधींकाळीं मनाला वाईट वाटून घेतले असेल. आतांशा त्या बाजूचा विचार करण्याचें त्यांनीं सोडूनच दिले होते; पण एका मुग्ध सुंदर स्त्रीच्या तिरस्काराला मात्र आपण विनाकारण पात्र झालों हे पाहून हणमंतरावांच्या हृदयाला आज-काल एक नवीनच रुखरुख लागून राहिली होती. मंदाकिनीला आपल्यामुळें त्रास होऊं नये म्हणून तिच्या दारावरून जातांना ते एकाद्या चोरासारखे अगदीं गुपचुप जाण्याचा प्रयत्न करीत; पण मंदाकिनी दारात आली नाहीं म्हणजे त्याना दिवसभर चुकल्या चुकल्यासारखें वाटे. कारण आतांशा त्याचे मन– ती त्याचा तिरस्कार करी म्हणूनच कीं काय– तिच्याकडे विलक्षण ओढ घेत असे. या आकर्षणामुळें खोली सोडण्याविषयींचा कधी कधी त्यांच्या मनांत येत असलेला विचार ते अगदी दूर सारून देत. संवयीचा परिणाम म्हणून म्हणा किंवा साऱ्या जगांत तिरस्कारानें वा प्रेमानें हणमंतरावांकडे उत्कंठतेनें बघणारा एकही प्राणी नसल्यामुळें म्हणा– मंदाकिनीचा तिरस्कार हा हळुहळू हणमंतरावांचा जीवनाधार बनला.

आतांशा ऑफिसमधून बाहेर पडल्यावर मंदाकिनीशिवाय दुसऱ्या कशाकडे हणमंतरावांचें लक्षच नसे. रस्त्यांत भेटलेलीं ओळखीचीं माणसेंहि त्यांना त्या तंद्रींत असल्यामुळें ओळखत नसत. ऑफिस-मधून येतांना करावयाचीं म्हणून ठरविलेलीं कामें त्यांच्या ध्यानांत राहीनातशीं झालीं. आपण कुठल्या रस्त्यानें जातों आहों, याचेंहि त्यांना हळुहळू भान राहात नाहींसें झालें. अशाच बेभान स्थितींत बुधवार चौक ओलांडीत असतां त्यांना मोटारीचा धक्का बसून ते सप-शेल उताणे पडले व त्यांच्या पायावरून मोटारीचें चाक गेलें.

त्या दिवशीं संध्याकाळीं मंदाकिनी एक गळपट्टा — तो दादासाठीं आहे असें ती आग्रहानें म्हणे — पण तें कोणालाच खरें वाटत नव्हतें — विणीत आपल्या दादाच्या खोलींत बसली होती. रोज या वेळे-लाच वहाणांचा कर्‌ कर्‌ आवाज होतो व आपण वेड्यासारख्या दारांत धांवत जातों नाहीं, असा ती स्वतःशींच विचार करीत होती. पण आज ती गालांतल्या गालांत हंसत होती, आज ती फसण्याचा संभवच नव्हता. कारण गोपाळराव नुकतेच चहा पिऊन तिच्या दादाबरोबर व्याख्यानाला गेले होते. मंदाकिनीचीं लवचिक बोटें भराभर काम करीत होतीं. अर्धा तास लोटला. मंदाकिनीच्या मनांत एक प्रकारची चमत्कारिक अस्वस्थता उत्पन्न झाली. तिच्या इच्छे-विरुद्ध तिचें कान दिंडीकडे लागले; जरा वेळानें विणीत विणीत ती दरवाजांपर्यंत दोन खेपा घालून आली. आपण दादाची वाट पहात आहों, अशी तिनें आपल्या मनाची समजूत घालण्याचा प्रयत्न

केला. पण दादा इतक्या लवकर कधींच घरीं येत नसे. मनाप्रमाणें तिचें शरीरही अस्वस्थ झालें. आपलें विणकाम घेऊन ती मागल्या अंगणांतल्या बागेंत गेली. तेथें फिरतां फिरतां तिची मागल्या चाळी-वजा खोल्यांकडे नजर गेली. त्यांतल्या बहुतेक खोल्यांचीं दारें उघडीं होतीं, पण कडेची एक खोली मात्र लावलेली होती. एक दीनवाणें कुलूप तिच्यावर लटकत होतें. त्या बंद उदास खोलीकडे पाहून मंदाकिनीच्या हृदयांतील मृदु भावना जागृत झाल्या; ती हणमंत-रावांची खोली हें तिला ठाऊक होतें. हणमंतरावांचे नांव तिच्या मनांत आल्याबरोबर मंदाकिनी चमकून जागच्या जागीं उभी राहिली. अस्वस्थतेचा उलगडा झाला असें तिचे एक मन मंद स्वरानें म्हणत होतें. पण तिच्या दुसऱ्या मनानें ही कल्पना हास्या-स्पद म्हणून बाजूला सारली. ज्यांचें तोंड पहाण्याचाही आपण कंटाळा करतो त्या हणमंतरावांची आज आपण वाट पहातों आहों ? छे! भलतेंच एखादें. उलट नेहमी होणारा तो तिरस्करणीय कर्र् कर्र् आवाज ऐकूं आला नाहीं, म्हणून आपल्याला आज बरें वाटत आहे, असा मनाशीं निश्चय करून ती मोठ्या हुषारीनें बागेंत इक-डून तिकडे फिरूं लागली. पण जी हुषारी खरोखरी वाटत नव्हती तिचें सोंग किती वेळ आणतां येणार ? पुन्हा अगदीं अस्वस्थ होऊन ती आपल्या विणकामाकडे बघत निश्चल उभी राहिली.

"हणमंतराव जोशी इथेंच राहातात कां ?" सभ्य, नम्र आवा-जांत विचारलेलें वाक्य तिच्या कानावर पडलें. तिच्या सगळया मनो-

वृत्ति खडबडून जाग्या झाल्या.

“ हो इथेंच ” ती उत्सुकतेनें म्हणाली. “ ती त्यांची खोली. पण ते अजून घरीं आले नाहींत. ”

त्याची खोली कोठली हें समजतांच गडबडीनें तो गृहस्थ म्हणाला, “ म्हणजे, त्यांच्या घरीं दुसरं कोणी नाहीं वाटतं ? अरे अरे, उगीच मग त्यांना इकडे आणलं. इस्पितळांतच पोंचविलं असतं तर बरं झालं असतं ” चिंतातुर स्वरानें तो गृहस्थ म्हणाला.

“ इस्पितळांत ! तें कां ? म्हणजे हणमंतराव आजारी आहेत कीं काय ? ” मंदाकिनीनें विचारलें. तिच्या छातींत भीतीनें धडधडूं लागले होतें.

त्या गृहस्थानें अपघाताची सगळी हकीकत मंदाकिनीला थोडक्यांत सांगितली. तो परका गृहस्थ पण सज्जन असल्यामुळें बिचाऱ्या हणमंतरावांना त्यांच्या घरीं पोंचवायचें त्यानें आपण होऊन पतकरलें होतें. हणमंतरावांच्या खिशांतल्या एकदोन पत्रांवरून त्यांचा पत्ता त्याला कळला व ताबडतोब गाडी करून तो हणमंतरावांना मंदाकिनीच्या वाड्याकडे घेऊन आला. पण ही नवीनच अडचण उभी राहिलेली पाहून तो जास्तच पंचायतींत पडला.

“ काय करावं आतां. त्यांच्या पायावरून गेलंय चाक. नीट शुश्रुषा झाली तर ठीक. नाहीं तर बिचारा जन्माचा पायानें अधु होईल. ”

मंदाकिनी ही सगळी हकीकत ऐकून जमिनीला खिळल्याप्रमाणें

स्तब्ध उभी राहिली होती. तिच्या गोंधळलेल्या मनात त्या गृहस्थाचे शेवटले शब्द उच्चारले जात होते. " बिचारा जन्माचा पायानें अधु होईल. — " वहाणा घालून कर्र् कर्र् करीत कदाचित् त्यांना पुन्हां कधींही मिरवायला सांपडणार नाही. मंदाकिनीच्या डोळ्यासमोर हणमंतरावाची अंगणांतून जाणारी ती बेडौल मूर्ति क्षणभर उभी राहिली व तिचें मन विकृत होऊन तिच्या चेहऱ्यावर तिरस्कारयुक्त स्मित अर्धवट उमटलें. पण दुसऱ्याच क्षणीं ती भानावर आली. हणमंतराव दीनवाणें रस्त्यावर पडले असून त्यांच्या पायावरून मोटार जात आहे असा हृदयद्रावक देखावा तिच्या मनश्चक्षूंसमोर उभा राहिला, तिचे डोळे ओलावले, तिच्या मनांत एक विचारचक्र सर्रकन् फिरलें.

" खोलीची किल्ली त्यांच्या खिशांत सांपडेल तुम्हांला " ती त्या सज्जन गृहस्थाकडे पाहून एकदम म्हणाली.

तो गृहस्थ विचारांत गढून अजून तेथेंच उभा होता. तिचे शब्द ऐकून तो म्हणाला,

" कशाला आतां किल्ली ? इस्पितळांत जातों गाडी घेऊन. हं नशिब बिचाऱ्याचें. इस्पितळ म्हणजे यमपुरीच ती ! "

एक उसासा सोडून तो परोपकारी गृहस्थ दाराकडे वळला.

इस्पितळांत नीट शुश्रुषा न झाल्यामुळें जन्माचा पायानें अधु झालेला हणमंतराव मंदाकिनीला दिसूं लागला.

" नका, जाऊं नका " उत्कट स्वरानें ती म्हणाली. " इस्पित-

ळांत नको बाई. तुम्ही किल्ली आणा. मी त्यांचें अंथरूण घालून ठेवतें. मग तुम्ही त्याच गाडींतून डॉक्टरला बोलवायला जा. मी आईला आणतें बोलावून. आम्ही करूं त्यांची शुश्रुषा." भराभर मंदाकिनी बोलत होती. आपलें लहान मुलीचें न ऐकतां तो गृहस्थ गाडी इस्पितळाकडेच नेईल अशी तिला जशी काय भीतीच वाटत होती. जरा थांबून तिनें पुन्हां म्हटलें, "आणतां ना किल्ली?"

त्या लहान मुलीचा तो उत्साह व कळकळ व तिची हुशारी पाहून त्या गृहस्थाला कौतुक वाटलें.

"बरं तर" तो चटकन् म्हणाला. "तुम्ही तुमच्या आईला बोलावून आणा."

त्या गृहस्थाच्या पाठोपाठ गाडीपर्यंत मंदाकिनी गेली. तो हणमंतरावांचें खिसे चाचपीत असतां हळूंच तिनें गाडींत डोकावलें. हणमंतराव बेशुद्ध होते. त्यांचा तो फिकट, दीनवाणा, एकाकी चेहरा पाहून मंदाकिनीचें अंतःकरण कळवळलें व त्या क्षणापासून मंदाकिनीच्या मनांतला हणमंतरावांविषयींचा तिरस्कार पूर्णपणें मावळून त्याची जागा करुणेनें घेतली.

---

# प्रेमाचा वांटा

“वेडया, ए वेडया. तुझ्या बाईसाहेब कुठ आहेत? जा आधीं आणि त्यांना मी घरी आलों आहे म्हणून सांग.”

एखाद्या प्रलयकालीन मेघाप्रमाणें नवीन बाहेर गर्जत होता. पण वेडयाला त्याचें कांहींच वाटत नव्हतें. आपल्या लहानशा खोलीत – खोली कसली, खुराडेंच तें– एका ठेंगण्या स्टुलावर बसून तो आपलीं नखें चावीत होता. त्याचे गरगरीत डोळे समोरच्या धुरानें काळया झालेल्या भिंतीवर स्थिर झाले होते.

नवीन संतापला व वेडयाच्या बंद खोलीच्या दारावर बुटानें धडक्या मारूं लागला. तट्टयाचें जीर्ण दार एका तुटक्याशा दोरीनें कुडाच्या भिंतीशीं कसेंबसें संलग्न केलें होतें. दोरी खसकन् कांचली व नवीन त्या खोपटांत शिरला. शांतपणें बसलेली वेडयाची ती बावळी मूर्ति पाहून नवीनचा संताप अधिकच वाढला. वेडयाच्या खांद्यास धरून त्यानें त्याला गदगदां हलविलें. वेडयानें समोरच्या भिंतीवरून आपली नजर काढून नवीनच्या चेहऱ्याकडे वळविली. पण त्याच्या त्या शून्य दृष्टीवरून त्याला कांहींच अर्थबोध झाला नसल्याचें स्पष्ट दिसत होतें. अधिकच संतापून नवीननें त्याला स्टुलावरून धाडकन् ओढलें. स्टुल दणकन् जमिनीवर कलंडलें. नवीन वेडयाला फरफटत ओढीत अंगणांत घेऊन आला व फरशीवर त्याला आद-

ळून तो पुन्हां ओरडूं लागला,

" वेड्या, ए वेड्या. तुझ्या बाईसाहेब कोठें आहेत? हरामखोरा, बोल ना. "

वेडा, ज्या स्थितींत नवीनने त्याला आदळले होते, त्याच स्थितींत स्वस्थ पडून राहिला.

" ए ढोंग्या, तुझें मुक्याबहिऱ्याचे ढोंग बस्स झालें; मी तुला पक्का ओळखतों, समजलास. कुठं आहेत बाईसाहेब, बोल, नाही तर हा बघ हंटर. "

नवीन इतकें बोलतो आहे तोंच वाड्याचें पुढलें दार उघडले व निर्मला हंसत हंसत नवीनाशेजारीं येऊन उभी राहिली. नवीन ऑफिसांतून येण्याचें वेळेस आज आपण घरीं नव्हतों, यामुळें अधीरतेने त्याला उत्पन्न झालेला संताप व वेड्यावर त्याचें निघालेलें उट्टें पाहून तिला मोठी मौज वाटली. पण, नवीननें तिला फार वेळ तेथें उभेंच राहूं दिलें नाहीं. त्याचा राग निर्मला दृष्टीस पडल्याबरोबर मावळला होता. तिचा हात धरून तिला जवळजवळ ओढीतच त्यानें दिवाणखाण्यांत आणलें. आपली शाल एका कोंचावर फेंकून निर्मला आरशासमोर उभी राहिली व आपल्या केंसावरून हात फिरवीत बोलूं लागली.

" काय बाई करावं या अविचारी स्वभावाला तरी ! किती मोठमोठ्यानें ओरडून विचारलं, तरी बहिऱ्याला ऐकूं कसं येणार अन् मुका उत्तर तरी कसं देणार ? आणि आपण आपली सगळी विद्वत्ता

खर्च केली तरी वेडयाच्या डोक्यांत त्याचा प्रकाश कसा पडणार ? ”

बोलतां बोलतां नवीनाकडे आपल्या डोळयाच्या कोंपऱ्यांतून तिनें एक लटका रोषपूर्ण कटाक्ष फेकला. नवीन तिच्या यौवनपूर्ण सौंदर्यानें, तिच्या पोशाखांतील ऐटबाज टापटिपीनें व तिच्या मधुर, लाडक्या आवाजानें मोहून गेला होता. तिच्या बोलण्याकडे त्याचें लक्ष नसून तिच्या स्वरांतील मोहिनीकडे व तिच्या हावभावांतील मधुर संगीताकडे होतें. पण शेवटचे शब्द त्याच्या अर्धवट कानाघर पडले.

“ वेडा ! वेडा बरा असेल ! पक्का हरामखोर आहे बेटा ! ” दिवाणखान्याच्या अर्ध्या उघडया दारांतून बाहेरील अंगणाकडे त्याची नजर गेली. निर्मला घरात शिरल्यापासून वेडयाची मुखचर्या एकदम पालटून गेली होती. चटकन् उठून आपला मळका सदरा व धोतर त्यानें झटकले. आपल्या तोंडावर आलेले आपले लांब भुरके केस बाजूला सारून दोन्ही हात पाठीमागें जुळवून तो दिवाणखान्याकडे उत्सुक दृष्टीने पहात उभा राहिला. तें दृश्य पाहून नवीनाला पुन्हा संतापाचा झटका आला. मघाच्या चेहऱ्यांतील बावळट बेपर्वाई व आतांच्या चेहऱ्यांतील उत्सुक तरतरी यांमधील फरक त्याच्या अंतःकरणाला बोचला. वेडयाची ती बुभुक्षित दृष्टि टाळण्यासाठीं, चटकन् उठून, त्यानें दिवाणखान्याचें दार धाडकन् लावून टाकलें.

निर्मला त्याचा तो संतापावेग पाहून खदखदा हसूं लागली.

नवीनाच्या बाहूवर टिचक्या मारीत, खोडकरपणानें ती म्हणाली.

" दार लावून टाकून चहा फराळाचें काय जादूच्या कांडीनें उत्पन्न होणार आहे वाटतें ? "

" या वेड्याशीं डोकेफोड करण्यापेक्षां उपाशी राहिलेलें पत्करलें " नवीन गुरगुरला.

" कोणी सांगितलं आहे पण डोकेफोड करायला! बिचारा वेडा — त्याच्याशीं दांडगाईनें वागलं म्हणजे जास्तच बावरून जातो. अशा माणसाशीं जरा नरमपणेंच नको कां घ्यायला ? "

" पण, सांगितलं होतं कोणी असा वेडा घरांत घ्यायला ? दुसरे नोकर काय थोडे पडलेत ! हा सगळा तुमचा दुराग्रहीपणा— " नवीन खरोखरच रागावला.

निर्मलेनें त्याच्या स्कंधाला हळूंच स्पर्श करून म्हटलेः—

" आपल्या परवानगीवांचून कां बरं मी ठेवला त्याला नौकरीला ? ऐन थंडीच्या दिवसांत उघडावाघडा, गारठून, भुकेलेला असा तो रस्त्यांत पडला होता. तेव्हां गाडी थांबवून प्रथम आपणच त्याची चौकशी केली ना ? "

वेड्याची त्यावेळची ती केविलवाणी अवस्था आठवून निर्मलेचें कोवळें मन कळवळलें व तिचें डोळे चटकन् अश्रूंनीं भरलें.

" बरं, बरं, असूं दे त्याला. " चटकन् नरमून नवीन म्हणाला. " वेळी अवेळीं, गंगायमुनांचा पूर नको आमच्यावर कोसळायला ! "

निर्मलेच्या तोंडावर पाऊस उन्हाचा खेळ झाला. डोळे पुसून तिनें

दिवाणखान्याचें किंचित् दार उघडलें व अत्यंत मृदु पण स्पष्ट स्वरांत हांक मारिली.

" वेड्या. "

वेड्यानें एखाद्या विश्वासू कुत्र्याप्रमाणें चटकन् कान उभारले.

" वेड्या. "

दुसरी हांक ऐकल्याबरोबर एकाच उडीसरशी तो दिवाणखान्यांत शिरला व बाईसाहेबांना लवून मुजरा करून त्यांच्या आज्ञेची वाट पहात, जमिनीकडे नजर लावून तो उभा राहिला. निर्मला सावकाश व स्पष्ट आवाजांत, त्याच्याशीं बोलूं लागली. वेड्यानें नजर उचलली व तिच्या तोंडाकडे तो लक्षपूर्वक पाहूं लागला. तिच्या ओठांच्या हालचालीवरून व तिनें केलेल्या कांहीं खुणांवरून बोलण्याचा आशय त्याच्या ताबडतोब लक्षांत आलासें दिसले. पुन्हां लवून मुजरा करून तो खोलीच्या बाहेर पडला.

" खरंच, माझं मला सुद्धां आश्चर्य वाटतं एखादं वेळ, " अर्ध-वट आपल्याशी व अर्धवट नवीनाला उद्देशून निर्मला म्हणाली. " या बहिऱ्याला दुसऱ्या कोणाचं बोलणं ऐकूं येत नाहीं, अन् माझंच कसं येतं ? दुसऱ्या कोणाला न जुमानणारा हा वेडा माझ्याशीं कसा अगदीं नमून असतो ? खरोखरी याचा माझा पूर्वजन्मीचा कांहींतरी संबंध असला पाहिजे खास. "

नवीन वेड्याचा व निर्मलेचा संवाद त्रासिकपणें ऐकत होता. वेड्याची निर्मलेशीं असलेली नम्र वागणूक पाहून त्याला संताप

उत्पन्न होत होता. निर्मलेचे शेवटलें शब्द ऐकून तो किंचित् कुत्सित पणें म्हणाला,

"पूर्वजन्मीचा संबंध ! कोण जाणे ! या जन्मींचा कशावरून नसेल ?"

निर्मलेनें चटकन् पाठमोऱ्या वेड्यावरची नजर काढून नवीनाकडे वळवली. नवीनाच्या बोलण्यांतील खोंच तिच्या हळव्या मनाला बोचली. तिचें डोळे पाण्यानें भरून आहे. नवीनाचें मूळचें मन जरी हळुवार नव्हतें, तरी निर्मलेशीं वागतांना तें नवनीताहूनहि मृदु होत असे. निर्मलेच्या मनाला शल्य टोंचलेलें पाहून त्याचें मन कळवळले. खुर्चीवरून उठून तो निर्मलेच्याजवळ गेला व तिचा कोमल हात आपल्या दोन्ही हातांत धरून त्यानें प्रेमपूर्वक दाबला.

* * * *

नवीन चहा घेऊन टपाल पहात होता. निर्मला, रोजच्या ठराविक कार्यक्रमाप्रमाणें, कोपऱ्यांतील पियानो उघडून, अपेक्षित सूर दाबीत होती. पण तिचें लक्ष, तिच्या आवडत्या पियानोवादनाकडे आज विशेषसें दिसत नव्हतें. पियानोच्या मधुर स्वरसंगमाशीं विसंगत असा एक निराळाच सूर तिच्या हृदयांत वरचेवर निनादित होऊन तिच्या संगीतांत बिघाड पाडीत होता. "या जन्मींचा कशावरून नसेल ?" "या जन्मींचा कशावरून नसेल ?"– निर्मलेचा स्वभाव कांहीं जात्या विचारप्रिय नव्हता. एखाद्या फुलपांखराप्रमाणें तिचें आयुष्य स्वच्छंद नाचण्याबागडण्यांत गेलें होतें. उद्यांचा विचार तिच्या मनाला कधींच शिवत नसे. अशा एका वाक्यावर तासचेतास विचार करीत

बसूं, असें जर कोणी आठ दिवसांपूर्वी सांगितलें असते, तर तिनें हंसून थट्टा केली असती.

नवीनला मात्र निर्मलेच्या हृदयांतील खळबळीची कल्पनाहि नव्हती. मघांशी झालेल्या भांडणाचा समेट अद्याप झाला नसेल, असें त्याला वाटलें नव्हतें. निर्मला व नवीन दिवसांतून शंभर वेळा भांडत असत. नवीन स्वभावानें तापट व अविचारी असल्यामुळे रागाच्या भरांत तो पुष्कळ वेळां निर्मलेच्या मनाला लागेल असें बोलत असे. पण दोघेहि फार हळव्या मनाचीं असल्यामुळें समेट होण्यालाहि वेळ लागत नसे. अशापैकींच आजचाहि प्रसंग असावा असे नवीनाला साहजिकच वाटल्यामुळे तो निभ्रांत चित्तानें टपाल चाळीत होता. पत्रें पहातां पहातां तो मध्येच थांबला. व "बक्षीस, बक्षीस" म्हणून हंसत हंसत मोठ्यानें ओरडला. निर्मलेनें वळून पाहिलें. निळ्या रंगाचें एक जाडसें पाकीट हातांत ऊंच धरून नवीन हलवीत होता. "मालूचें पत्र आहे तुला, काय बक्षीस देशील, बोल." निर्मला एखाद्या बालकाप्रमाणें धांवतच गेली व नवीनाच्या हातांतून पत्र ओढून घेऊन, फोडून वाचूं लागली. नेहमींप्रमाणें, वाचतां वाचतां कांहीं गमतीची गोष्ट आली, म्हणजे ती नवीनास सांगत होती.

"ऐकलं कां ? निमला चालूं लागली. आणि गडे, हें पहा, मालूनें कॉलेज मॅगेझिन्‌मध्यें एक कविता लिहिली आहे. आहे कां नाहीं मौज, सांगा ना ?"

नवीन "हूं हूं" करीत आपलीं पत्रें वाचण्यांतच निमग्न होऊन

गेला होता. सबंध पत्रच त्याला मग सावकाशपणें वाचावयास मिळणार होते. मग आतांच कशाला एवढें तो लक्ष देतो आहे !

निर्मला सांगतां सांगतां एकदम थांबली. नवीनाकडे एक चोरटी नजर फेंकून त्याचें आपल्याकडे लक्ष नाहीं, अशी खात्री करून घेऊन ती पियानो जवळच्या खुर्चीवर जाऊन बसली. दोन्ही कोंपरें पियानोच्या झांकणावर टेंकून ती वाचण्यांत गर्क झाली. वाचतांना तिच्या चेहऱ्यावर करुणा, आश्चर्य, कुतूहल इत्यादि विकारांची गर्दी उसळत होती. मधनमधून खिडकींतून वेड्याच्या खोपटाकडे ती एक शून्य नजर टाकीत होती. पत्र संपलें. तिनें पुन्हा एकवार नवीनाकडे दृष्टिक्षेप केला. नवीनाचें निर्मलेच्या हालचालीकडे बिलकूल लक्ष नव्हतें. नोटपेपर चटकन् पाकिटांत घालून तिने पियानोच्या ड्रॉअर मध्यें पत्र टाकलें व ड्रॉअरला झटकन् कुलूप घालून, ती पुन्हा पियानोचे सूर कांपऱ्या बोटानें दाबूं लागली. तितक्यांत नवीनाचेहि टपाल वाचून झालें. एकवार मनःपूत आळस देऊन तो खुर्चीवरून उठला व कोटाच्या दोन्ही खिशांत हात खुपसून तोंडाने शीळ घालीत इकडे तिकडे फिरूं लागला. फिरतां फिरता निर्मलेजवळ येऊन, तिच्या खुर्चीच्या पाठीवर हात ठेवून तिच्या सरकत्या बोटाकडे तो शून्य दृष्टीनें पाहूं लागला. अद्यापिहि नुकताच वाचलेला नानाविध मजकूर त्याच्या मनांत घोळत होता. निर्मला मात्र नवीन उठल्यापासून अतिशय अस्वस्थ झाली होती. नेहमीप्रमाणे नवीन माल्र्चें पत्र वाचावयास मागेल म्हणून ती भीत होती. कातरपणामुळें पियानोहि तिच्या

हातून धडपणें वाजवला जात नव्हता. व हें नवीनाच्या लक्षांत येईल म्हणूनहि ती भीत होती. या संकटांतून सुटण्याचा मार्ग शोधता शोधतां तिला एक युक्ति सुचली. धाडकन् पियानो मिटून ती खुर्चीवरून उठली व लाडिकपणे नवीनच्या बोटांशीं खेळत म्हणाली.

" इश्श मेला, पियानोचा सूर लागतच नाहीं आज. चला गडे, आपण आतां लांब लांब फिरायला जाऊं. "

नवीनशी थोडया प्रमाणात कां होईना पण फसवणुकीचें वर्तन तिने आजच प्रथम केलें होतें. त्यामुळे तिचें कोमल मन तिला सारखें खात होते.

" ठीक, ठीक चला. " नवीननें म्हटलें. टेबलाकडे पुनः एकवार नजर टाकून तो स्वतःशींच म्हणाला " टपाल झालेच पाहून सगळे. एक न्यूजपेपर राहिलाय तो वाचूं रात्री. " टपाल नीट जुळवून टेबलावर ठेवतां ठेवतां त्याला आठवण झाली.

" खरंच, मालूचं पत्र वाचायचं राहिलंच कीं. दे पाहूं, काय म्हणते पोरगी पाहूं. "

निर्मलेची धाकटी बहिण मालती अतिशय विनोदी व मार्मिक असून पत्रे लिहिण्यांत मोठी वस्ताद होती. तिचे पत्र म्हणजे पंधरावीस मिनिटांचा एक उत्तमपैकीं काव्यशास्त्रविनोद असे.

निर्मला विषय टाळण्याचा प्रयत्न करूं लागली. "मग देईन पत्र रात्रीं, चला गडे फिरायला जाऊं. " " नाहीं, नाहीं, आताच द्या " नवीनने हट्ट धरला. नवीन जितका कोमल मनाचा तितका हट्टी

होता. निर्मलेला त्याच्या हट्टीपणापुढें साश्रुनयनानीं कां होईना, पण नेहमीं पड खावी लागे. पण आज मात्र पड खाणें शक्यच नव्हतें. नवीन खुशींत असला म्हणजे निर्मला जितकी मोकळ्या मनानें लडिवाळपणा करी तितकीच नवीन रागावला म्हणजे ती भीत असे. निर्मला भ्याली, रडकुंडीस आली, पण पत्र देण्याचें मात्र साफ नाकारलें. नवीन संतापला. आपल्यापासून लपवून ठेवण्याची निर्मलेची इच्छा पाहून त्याला आश्चर्य वाटलें. ज्या प्रेमांत कांहीं आडपडदा राहूं शकतो, तें प्रेम कसलें ! तो निर्मलेला लागेल असे बोलला व शेवटीं तिच्याकडे एक अत्यंत भेदक दृष्टिक्षेप करून क्लबांत चालता झाला. निर्मला खिन्नपणें तोंड हातांनीं झांकून घेऊन रडूं लागली.

हें नेहमींचेंच होतें. अशीं अनेक लहानसहान भांडणें त्यांच्यांत होत. निर्मलेकडे अशी मर्मभेदक नजर टाकून नवीन कितीवेळा तरी क्लबांत निघून गेला होता. आतां नवीनचें प्रेम आपल्याला कायमचें अंतरलें असें समजून निर्मला कितीवेळां तरी हताश हृदयानें रडली होती. पण तिच्या हृदयाच्या एका कोंपऱ्यांतून तिची जबर आशा तिला नेहमीं सांगत असे कीं नवीन राग लवकरच विसरेल. पंधरा मिनिटांच्या आंतच नवीन परत येईल व डोळ्यांत पाणी आणून आपली क्षमा मागेल. आणि ही तिची अपेक्षा नव्याण्णव हिश्यांनीं नेहमीं खरी ठरे. पण, आज मात्र खरोखरीच्या निराश हृदयानें निर्मला रडत होती. नवीन आज लवकर परत येणार नाहीं, असें तिचें मन तिला सांगूं लागलें; व आश्चर्याची गोष्ट म्हणजे न आला

तरच, बरा असेंहि तिला वाटूं लागलें. कारण तिला कितीतरी गुंता-गुंतीच्या गोष्टींचा मनाशीं विचार करायचा होता.

नवीन आतां येणे शक्य नाहीं अशी खात्री झाल्याबरोबर ती उठली. पियानोमधील पत्र काढून घेऊन ती आपल्या खोलींत गेली. दार लोटून घेऊन, तिने एका इझिचेअरवर अंग टाकले व विचार करण्याची तयारी केली. पण विचार करणे म्हणजे कांहीएक विशिष्ट मूर्त काम उरकून टाकणे नव्हे. स्वस्थ पडून कितीतरी वेळ झाला तरी आपले विचार तिला जुळवतां येईनात. नवीनाचा राग, वेडा, मालूचें पत्र कितीतरी गोष्टींचा विचार करून तिला उलगडा पाडायचा होता.

नवीन आपणावर रागावला आहे. याची आठवण होताच निर्मलेच्या क्षणभर विराम पावलेल्या अश्रुधारा दुप्पट जोराने पुन्हा वाहूं लागल्या. आतां पुनः नवीन आपणाकडे प्रेमानें पाहणार नाहीं! इतक्या दिवसांच्या किरकोळ भांडणांनीं आपल्या दोघांच्या हृदयांत एकमेकांविषयी हळुहळूं अढी पडत गेली व आज तिला शेवटची पक्की गांठ बसली. आता प्राण दिला तरी हृदयाचा हा पीळ उलगडणें शक्य नाहीं, असें तिला वाटूं लागले. प्रेमासारख्या नाजूक उच्च भावनेशीं आपण आजपर्यंत एकप्रकारचा खेळ खेळत होतों त्याचें प्रायश्चित्त शेवटीं आपणाला मिळालें, अशा विचारांनीं तिचें कुसुम-कोमल हृदय फुटत होतें.

आणि नंतर वेडा! वेडा नसता तर आज या पत्रांच्या क्षुल्लक

गोष्टीवरून नवीन इतका रागावला नसता. निर्मला जरी बाह्यांतरीं अल्लडपणें वागे तरी ती अत्यंत चाणाक्ष होती. नवीनाच्या मनांत वेडयाविषयीं एकप्रकारचा सूक्ष्म मत्सर उत्पन्न झाला आहे हें तिच्या केव्हांच ध्यानांत आलें होतें. प्रेम, विशेषतः नूतन विवाहित प्रेम बारीक बारीक गोष्टीतसुद्धां अतिशयच मत्सरी असतें. पण, वेड्यां-विषयीं निर्मलेच्या मनात आत्यंतिक अनुकंपेशिवाय दुसरी कोठलीहि भावना नसल्यामुळें तिला नवीनाच्या मत्सराची एक प्रकारची मौजच वाटे आणि त्याला चिडविण्यासाठीं त्याच्या मत्सराला उत्तेजन मिळेल, असें ती मुद्दामच वर्तन करी. हा आणखी एक प्राणघातक खेळ प्रेमाशी आपण खेळलों असें आतां निर्मलेला वाटूं लागलें.

पण--पण--निर्मला, कांहींएक विचार मनांत येऊन जराशीं दचकली. वेड्याविषयीं आपल्या मनांत अनुकंपेशिवाय दुसरें कांहीं नाहीं हें खरें ना ? त्याला घरांत नोकर म्हणून कायमचा ठेवण्याचा आपण हट्ट धरला, तो केवळ दयेनें प्रेरित होऊनच ना ? आठवूं दे--नीट आठवूं दे मला. वेडयाचे ते गरगरीत टपोरे डोळे, ते डोळे वेडयाचे होते, म्हणूनच फार सुंदर दिसत होते नाहीं ? शहाण्या माणसा-प्रमाणें नानाविचार प्रतिबिंबित होऊन त्या डोळ्यांचें मूळचें निर्मल स्वरूप दूषित होत नव्हतें. ! पण, नको, नको हा विचार ! वेडयाच्या मुद्रेंत आकर्षक असें आपल्याला कांहीं आढळलं म्हणून आपण त्याला आश्रय दिला ? छे, खोटें, खोटें अगदीं !--कोण म्हणतं असं--

आणि नंतर वेड्याची आपणावर असलेली उत्कट भक्ति. आप-

त्याला हा भक्तीचा उपहार प्रिय वाटत नाहीं काय ? आपल्या दर्शना-शिवाय वेड्याची बुद्धि चलन पावत नाहीं, याचा आपल्याला अभि-मान वाटत नाहीं काय ? कांहींतरी पूर्वजन्मींचा याचा आपला संबंध –“ पूर्वजन्मींचा संबंध– या जन्मींचा कशावरून नसेल ? ”– अरेरे, काय बोलला नवीन हें ! पण, छ, तें अर्धवट थट्टेनें होतें नाही का ? पण ते खरें ठरले तर नवीनाला काय वाटेल ?

निर्मलेनें आपल्या हातांतील मालूचे पत्र उलगडले. आपल्याला हवा असलेला मजकूर शोधून काढून त्याच्यावर ती आपल्या अंगु-लीचे आरक्त अग्र फिरवूं लागली.

“ ताई, तुला एक गंमत सागायचीय्. मोठी रोमॅंटिक आहे बघ. आपल्या कॉलेजातला तो नलिनीकांत जोशी आठवतो तुला ? अग तो मोठा पोएट, रोमॅंटिक माणूस होता तो ! हुशारहि तसाच होता. स्कॉलर होता तो पहिल्या दोन वर्षीं. पण, पुढ त्याचे अभ्यासावरचें लक्षच उडाले. अन् तो वरचेवर नापास होऊं लागला. कशानें ताई-साहेब, आहे का लक्षात ? आपल्यामुळें बरं, आपल्या प्रेमामुळं ! हे तुला माहितच आहे सगळं. पण खरी गंमत पुढच आहे. तुझं लग्न झालेलं ऐकून त्याला वेड लागलं म्हणे आणि त्याच्याहून मोठी गंमत म्हणजे भय्यासाहेबांच्या नोकरीनिमित्त तूं उत्तर हिंदुस्थानात गेलेली ऐकून, ही स्वारी पण तुझा पत्ता काढण्यासाठीं उत्तर हिंदुस्थानांत दौऱ्यावर गेली आहे ! आहे कां नाहीं रोमान्स ? आतां याच्या पुढचा रोमान्स तूं मला कळव–एक दिवस हा वेडा तुला रस्त्यात

कसा भेटला–मग तूं मोठ्याने किंकाळी कशी फोडलीस–तुझ्या प्रिय प्राणनाथांनीं इतक्यांत कोठुनसे येऊन तुला हातावर कशी सावरली–सगळं, सगळं हां—''

निर्मलेने पत्राची घडी केली. काय चमत्कारिक योगायोग ! आपण घरांत एक वेडा ठेवावा आणि याच सुमारास मालूचें हे असलें विचित्र पत्र यावें ! कोणाला या दोन गोष्टी सांगितल्या तर वाटायचं कीं हाच तो वेडा– दुसऱ्या कोणाला कशाला ? नवीनाला हें पत्र दाखवल असतं तर त्यालाहि असंच वाटलं असतं आणि म्हणूनच आपण शहाण-पणानें त्याला पत्र दाखविण्याची टाळाटाळ केली. पण, पण, खरं तर नसेल ना हें ? — छे भलतंच एखादं. पण, कसा बरं होता त्या जोशाचा चेहरा !

विचार करतां करतां सहज निर्मलेची समोरच्या एका भिंतीवर टांगलेल्या फोटोवर नजर केली. ती ज्युनिअरमध्यें असताना गॅदरिंगच्या वेळीं काढलेला तो ग्रुप फोटो होता. ती उठून फोटोजवळ गेली व पाहूं लागली. फोटो बराच उंचावर टांगलेला होता, म्हणून तिला तो नीट दिसेना. व खालीं काढतांहि येईना. एक ठेंगणेसें स्टूल तिनें ओढीत फोटोखालीं आणलें व त्याच्यावर उभी राहून ती फोटोंतील विद्यार्थ्यांचें चेहरे एकामागून एक न्याहाळूं लागली.

इतक्यांत दारावर कोणी हळूच थाप मारल्याचा आवाज ऐकूं आला. पण निर्मला आपल्या व्यवसायांत अगदीं गर्क होऊन गेली असल्या-मुळें तिचें तिकडे लक्ष गेलें नाहीं. दार हळूच उघडून नवीननें खोलींत

प्रवेश केला. त्याच्या चेहऱ्यावर अनुतापाची छटा स्पष्ट दिसत होती. नेहमींप्रमाणें अर्ध्या रस्त्यावरून परतून निर्मलेशीं समेट न करता आपण येण्यास एवढा उशीर लावलेला पाहून आपल्या लाडक्या निर्मलेनें रडून रडून आकांत केला असेल, या कल्पनेनें, त्याचें हृदय शतधा विदीर्ण झालें होतें. जिन्याच्या व नवीनाच्या बुटांच्या आवाजानें निर्मला भानावर आली. स्टुलावरून चटकन् उतरून नवीनाला पाहून ती गोंधळून उभी राहिली. मनाच्या त्या बावऱ्या परिस्थितींत आपण फोटोंत काय शोधीत होतो व कां हे सगळें आपणाप्रमाणें नवीनालाहि सूर्यप्रकाशाप्रमाणे स्पष्ट दिसत असलें पाहिजे असें तिला वाटलें. बोलून उपयोग नव्हता. नवीनाचा स्वभाव कांहीं समजून सांगितले असतां पटवून घेण्याचा नव्हता. उत्तम उपाय म्हणजे गप्प बसायचं, काय होईल तें होईल. असा विचार करून तोंडावर कठोर बेपर्वाईचा आविर्भाव आणून स्टुलावरच्या आच्छादनावर आपल्या पायानें पडलेली धूळ ती टिचक्या मारून उडवूं लागली.

नवीन निर्मलेच्या तोंडावरील ती छटा पाहून चमकला. पण त्या कठोर बेपर्वाईचें कारण, आपलाच आजपर्यंत कधीं न अनुभवलेला कठोरपणा असें वाटून निर्मलेच्या किंचित् जवळ येऊन तो मृदु स्वरनें म्हणाला, " निर्मल, चुकलों मी क्षमा कर मला

पण निर्मलेला त्याच्या भाषणांत कुत्सितपणाचा वास आला. नवीनाचें व तिचें दोनतीन तासांपूर्वी पत्रावरून झालेले भांडण मध्यं तरी तिच्या मनांत उडालेल्या विचारांच्या खळबळीमुळे तिच्या अजि-

बात स्मरणांतून गेले होतें. त्यामुळें, एकदम खोलींत प्रवेश करून आपल्या एकांताचा भंग केल्याबद्दल नवीन औपचारीक कुचकेपणानें आपली क्षमा मागत आहे, असा तिला भास झाला. तिचा चेहरा जास्तच कठोर झाला.

" कसली क्षमा ? माफ करा, नवीन, असली घाणेरडी थट्टा मला खपणार नाहीं. "

नवीन आश्चर्यानें दोन पावलें मागे सरकला. याचा अर्थ काय ? निर्मलेच्या स्वभावांत हा असला कठोरपणा आज कोठून आला ? आतां काय बोलावें हे न सुचून तो उगीच खोलींत इकडे तिकडे पाहूं लागला. निर्मला ज्या इझिचेअरवर प्रथम बसली होती, तिच्या-वर ती मघाशी वाचीत असलेलें पत्र पडलें होतें. कसला कागद म्हणून सहज शून्यमनस्कतेनें त्याने त्या पत्रास हात घातला. नवीनचा तो निलाजरा धीटपणा पाहून निर्मल वाघिणीप्रमाणें चवताळून आली व तिनें नवीनच्या हातांतून तें पत्र जवळ जवळ हिसकल्यासारख केलें. नवीन अगदीं ओशाळल्यासारखा झाला. " निर्मल, क्षमा कर मला. तुझं ते पत्र आहे, हें मला माहीत नव्हतं." नवीन मनापासून म्हणाला. निर्मला म्हणणे नवीनाचा बहिश्चर प्राण होता. आपल्या प्राणाला आपण मघाशीं दुखवलें म्हणून तो आधींच दुःखी झाला होता; आपण क्षमा मागण्यास उशीर केला म्हणून त्याचें मन अनु-तापयुक्त झालें होतें. व आतां आपल्या क्षमा मागण्याचा कांहीं उपयोग नाहीं, निर्मल अतिशयच चिडली आहे हें पाहून तो अगदीं

दीनवाणा झाला होता.

पण निर्मलेला आपल्या मनांतील विचारकल्लोळांपुढे नवीनाची मनःस्थिति काय आहे हें बरोबर अजमावण्याचे भान उरले नव्हते. आपल्या मनांत चालू असलेले विकारभ्रमण नवीनाला कळले आहे, असा तिला क्षणिक भ्रम झाला होता. त्यामुळे नवीनाच्या बाहेरून नरमाईच्या दिसणाऱ्या वर्तनांत औपरोधिकपणा व उपहास पुरेपूर भरला आहे असे तिला वाटून ती अत्यत चिडून गेली होती.

बिचारा नवीन किंकर्तव्यमूढ होऊन गेला होता. रुळावरून क्षुल्लक चुकीने घसरलेली ही आपली प्रेमाची गाडी परत सरळ मार्गा-वर कशी आणावी हे त्याला समजेना. तो पुनः वेड्यासारखा इकडे तिकडे पहात खोलींत हिंडूं लागला. फिरतां फिरतां तो त्या फोटोच्या जवळ आला. निर्मला मघाशीं याच फोटोकडे पहात होती याची आठवण होऊन कांहींतरी बोलावे म्हणून निर्मला उभी होती त्याच दिशेकडे अर्धवट मान वळवन त्यानें प्रश्न केला, " निर्मल, कसला ग हा ग्रुप–फोटो ? कधी पाहिलेला आठवत नाही मला. " आतां मात्र निर्मलेच्या संतापाची चढती कमान तटकन् तुटून त्याचे अश्रत पर्यवसान झालें. प्रथम ती औपरोधिक क्षमा मागणं, नंतर पत्र उचलण्याचा धीटपणा व आतां हा फोटोबद्दल साळसूदपणे मारलेला टोमणा–संतापानें, खेदानें ती स्फुंदू लागली. नवीनाकडे आपली अश्रूंनीं अंधुक झालेली नजर फेंकीत ती हुंदक्यामुळें अस्फुट झालेल्या स्वरांत म्हणाली,

“ नवीन, असे आडून बाण मारणें तुम्हांला शोभत नाहीं. तुम्हांला काय वाटते आहे ते स्पष्ट बोलून एकदांचा सोक्षमोक्ष कां करीत नाहीं ? ”

असें म्हणत म्हणतच ती खोलीबाहेर चालती झाली.

नवीनाला कांहीच समजेना. आपण दोन तास घराबाहेर होतों, तेवढ्या वेळात आपले हें छोटेसें गृहराज्य अगदींच कसें उलटे पालटे होऊन गेले ? आपल्याच मेंदूत काही बिघाड झाला की निर्म-लाच वेड्यासारखी वागत आहे ? विचार करीत करीत नवीन निर्म-लेच्या इझिचेअरवर जाऊन पडला. त्याचे मन एकटेपणाच्या आत्यं-तिक हुरहुरीने भरून गेले होतें. निर्मलेच्या वागणुकीनें त्याचें मन गोंधळले होते. जवळजवळ वर्षाच्या निकट सहवासाने निर्मलेच्या हृदयाची आपणास पूर्णपणें ओळख पटली आहे, असें त्यास वाटत होते. ती खुळी समजूतच होती म्हणायची ! निर्मलेच्या हृदयात आपल्याला अज्ञात असा एक भाग अजून शिल्लक आहे ! दोन प्रेमी हृदयें एकजीव झाली म्हणजे त्याच्यांत कसलाहि अलगपणा राहूं शकत नाहीं, असें तज्ज्ञ म्हणतात तें खोटें तर !

पण, दोन प्रेमी हृदयें...नवीनाच्या विचाराला एक लहानसा धक्का बसून निराळी दिशा लागली. आपली दोघांचीं हृदयें एक-मेकांविषयींच्या पूर्ण प्रेमानें भरलेलीं आहेत ना ? आपलें हृदय आप-ल्याला माहीतच आहे. पण निर्मलेचें हृदय ? निर्मलेच्या हृदयाचा कोपरान् कोपरा आपल्याच प्रतिमेनें व्यापला असेल ना ? नवीन

अस्वस्थ झाला. आत्यंतिक प्रेम नेहमींच साशंक असतें. म्हणून म्हणा किंवा नवीनाचा स्वभाव जरासा शंकेखोर होता म्हणून म्हणा, या नवीन कल्पनेनें तो अतिशयच अस्वस्थ झाला. निर्मला आपल्या वरच प्रेम करते ना ? आपल्याला कोणी प्रतिस्पर्धी तर नसेल ना ? पण, छे, छे, हा वेडा विचार नको ! निर्मलेचें हृदय आपणास पुरे-पूर समजलें आहे. निर्मला जराशी अल्लड आहे, फारच हळवी आहे, अतोनात हट्टी आहे पण शुद्धमनस्क आहे. तिचें अंतःकरण स्फटिक मण्यासारखें निर्मल व पारदर्शक आहे. या शुद्ध, शुभ्र पृष्ठभागावर काळी छटा आलेली आपल्याला केव्हाच उमगून आली असती. पण या सबंध वर्षांत निर्मलेच्या हृदयांत कांहीं चलबिचल झाल्याची आपणास शंकासुद्धां कधीं आली नाहीं. हो पण, नाही म्हणायला या वेड्यावर मात्र निर्मलेची जराशी जास्त मोहब्बत...

नवीनाच्या विचारसूत्राला एकदम जोराचा धक्का बसून तें तुटलें. पायाला शल्य टोंचलेल्या एखाद्या माणसाचा हात, पाय चाचपतां चांच पतां दुःखाच्या जागेवर नेमका पडला म्हणजे दुःसह कळ निघाली तरी त्याला जसे नेमकी जागा सांपडल्याबद्दल एकप्रकारचें समाधान वाटतें. तसें वेड्याच्या विचाराबरोबर हृदयांत दुःखाची एक चमक निघाली तरी नवीनाला एकप्रकारचें समाधानहि झालें. वेडा हा आपल्या घरां तील सगळ्या असंतोषाचें मूळ आहे. वेडा येण्यापूर्वीं आपलें निर्मलेचें भांडण या थराला कधींच गेलें नव्हतें...वेड्याच्या आठवणी-बरोबर नवीनाचा सुप्त संतापी स्वभाव जागृत झाला. पश्चात्तापानें व

खेदाने नवीनाच्या स्वाभाविक तापटपणावर जरासें दडपण पडलें होतें. पण वेड्याच्या स्मरणांबरोबर हें वरील भस्माचें आवरण उडून जाऊन त्याचा क्रोधांगार पुनः धगधगीत होऊं लागला. त्या भरांत त्यानें ताडकन् उठून खोलीचा दरवाजा उघडला. दरवाजा उघडल्या-बरोबर, बाहेरच्या कोंपऱ्यात एक रकटें अथरून त्यावर बसलेली वेड्याची स्वारी त्याच्या नजरेस पडली. वेड्याजी आपले नित्याचे काम आटोपल्यावर बसण्याची ही ठरावीक जागा होती. नवीनाला वेडा नजरेसमोरहि नको असें म्हणून, निर्मलेला वेड्याजवळ वरचेवर काम पडे म्हणून, व वेड्याला निर्मलेचें सान्निध्य प्रिय असें म्हणून एकंदरींत तिघांनाहि वेड्याची ती बैठकीची जागा सोईस्कर पडत असे. नवीन खोलीबाहेर ताडकन् उठून काय बेतानें आला कोण जाणे पण वेड्याची निर्मलेच्या खोलीच्या दाराकडे आशाळभूत नजर लावून बसलेली ती तिरस्कारणीय मूर्ति पाहून मात्र आपलें कर्तव्य काय हें त्याच्या ताबडतोब ध्यानांत आलें. धडाधड बूट आपटीत वेड्याजवळ जाऊन एका लाथेसरशीं त्याला नवीनानें जमिनीवर पालथा पाडलें व त्याच्यावर निर्दयपणें लाथाबुक्यांचा व शिव्यांचा वर्षाव करण्यास सुरुवात केली.

बिचारा वेडा या अनपेक्षित हल्ल्यानें अगदींच बावरून गेला व आपल्या कर्कश भेसूर किंकाळ्यांनीं त्यानें सगळा बंगला दणाणून सोडला. मधल्या दिवाणखान्याचें दार खाडकन् उघडले व घाबरलेली निर्मला कावरीबावरी धावतच तेथें आली. तेथें चाललेला प्रकार

पाहून मात्र तिच्या भीतीची जागा आत्यंतिक क्रोध व तीव्र तिरस्कार यांनीं घेतली. तिचा तो महिषासुरमार्दिनीसारखा रागानें लाल व अतिशय चिडून गेल्यामुळे क्रूर झालेला चेहरा पाहून नवीन जरासा वचकलाच. पुढे काय करावे याचा विचार तो करूं लागण्यापूर्वीच निर्मलेने त्याला जोरानें बाजूला ढकलल्यासारखे केलें व वेड्याला उठून बसण्यास हळूंच मदत करीत ती गरजली. "नवीन तुम्ही आज शुद्धीवर आहात का? तुम्हाला लाज नाही वाटत या गरीब बिचाऱ्या दुर्बळ प्राण्यावर हात टाकायला? आणि शिवाय–" निर्मला जराशी चाचरली. पण फार विचार करायला वेळ कुठें होता? "आणि शिवाय" ती हलक्या स्वरात पण ठासून म्हणाली. "या वेड्याचं माझ्यावर एकेकाळी निरतिशय प्रेम होतं!"

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठाचा सुमार. निर्मला व नवीन चहापान करीत होती. वेडा खोलीच्या एका कोपऱ्यात उभा राहून जरूर ती सामुग्री पुरवीत होता. कालचा प्रसंग तिघांच्याहि स्मरणांत अगदीं ताजा होता, असें त्यांच्या मुखचर्येवरून स्पष्ट दिसून येत होतें. नवीनाच्या चेहऱ्यावरील संतापाचा पहिला भर ओसरला होता. निर्मलेनें रागाने त्याच्या अंगावर फेकून दिलेले मा[illegible] पत्र वाचून, नवीननें त्याच्यावर रात्रभर विचार केला होता. वेड्याची निर्मलेशीं, व तिची त्याच्याशीं वागणूक आपल्या अंतःकरणचक्षूपुढें उभी करून त्यानें तिची पूर्ण छाननी केली होती. आतां त्याच्या चेहऱ्यावर दिसणाऱ्या गंभीर करारी छटेवरून त्याने सध्याच्या बिकट परिस्थितीतून बाहेर

पडण्याचा कांहीं एक मार्ग शोधून काढला असून तो पार पाडण्याचा त्याचा दृढनिश्चय झाला असावा, असें दिसत होतें. निर्मलेच्या निस्तेज व मलूल चेहऱ्यावरून तिनें सारी रात्र आपल्या अविचारी उतावळेपणाबद्दल पश्चात्तापाचे अश्रू ढाळण्यांत खर्च केली असावी असा सहज अदमास करतां येत होता. वेड्याचा चेहरा मात्र अत्यंत प्रसन्न व अशापूर्ण दिसत होता. त्याच्या चेहऱ्यावरील नेहमींची बावळया वेडेपणाची छटा ओसरून एक प्रकारचें बुद्धितेज त्याच्या चेहऱ्यावर पसरलें होतें.

नवीन शांत मुद्रेनें चहाचे घोट घेत होता. एक कप संपवून दुसरा भरण्यासाठीं त्यानें निर्मलेच्या पुढें केला. टेबलावरील आणखी एक कप घेऊन तो भरण्यासाठीं नवीनानें निर्मलेच्या पुढे सारला. निर्मलेनें आश्चर्यचकित मुद्रेनें कपांत चहा ओतला. तिसरी एक खुर्ची आपल्या शेजारीं ओढून तिच्यापुढील टेबलाच्या भागावर तो तिसरा कप सारीत नवीन वेड्याकडे पाहून उद्गारला.

"नलिनीकांत, या वेड्याच्या सोंगाचे आतां प्रयोजन उरलें नाहीं. तुमचा कार्यभाग संपला. आतां एखाद्या सभ्य गृहस्थाप्रमाणें माझ्या शेजारी बसून चहापान करण्यास तुम्हांस हरकत नाहीं."

वेडा किंचित् गोंधळला. त्याला काय करावें तें समजेना. त्यानें निर्मलेच्या तोंडाकडे नजर टाकली. पण तेथेंहि आत्यंतिक आश्चर्या-शिवाय त्याला कांहींच दिसलें नाहीं. तेव्हां मोठ्या रुबाबदारपणें मान बाकवून त्यानें नवीनाच्या आमंत्रणाचा स्वीकार केला व आसन

स्वीकारून चमचा चहाच्या कपांत फिरविण्यास सुरुवात केली. त्यांच्यासमोर बसलेल्या निर्मलेनें आपल्या प्रेमासाठीं झगडणाऱ्या त्या दोन पुरुषांकडे एकवार नजर टाकली. पण, आज तिच्या डोळ्यांत अभिमानाचें पाणी खेळत नव्हतें. काल याच वेळी त्या दोघांना ती आपल्या लहानशा बोटावर नाचवीत होती. पण आज मात्र त्यांची वागणूक तिला धड समजतहि नव्हती. मंदौत्सुक्य व कातरता यांनीं परिपूर्ण अशा डोळ्यांनीं ती त्यांची प्रत्येक लहानशी हालचाल लक्ष-पूर्वक पहात होती.

आपला चहा संपवून, कप बाजूला ढकलीत नवीनानें रुमालानें तोंड पुसलें. त्याच्या तोंडावरील गांभीर्याची छटा हळुहळूं विचलित होत होती. दोन्हीं कोंपरे टेबलावर टेंकून आपले उताणे तळवे जुळवून त्यावर मस्तक ठेकून, त्यानें कंपित स्वरानें प्रश्न केला.

“ नलिनीकांत, आतां मी काय करावे, अशी तुमची इच्छा आहे ? ”

वेडा गोंधळला. चहाचा कप अर्धाच खालीं ठेवून, दोन्ही हाताचीं बोटें एकांत एक अडकवून त्यांकडे तो बघूं लागला. आपली काय इच्छा आहे, हें त्याला तरी कोठें माहीत होतें ? दक्षिण हिंदुस्थानांतून निर्मलेचा शोध काढीत तो उत्तर हिंदुस्थानांत आला व निर्मलेच्या घरीं वेड्याचें सोंग घेऊन राहिला, त्यांत त्याचा कांहीं विशिष्ट असा उद्देश मुळींच नव्हता. आपल्या प्रिय वस्तूचें सतत सान्निध्य, सेवारूपानें कां होईना, प्राप्त व्हावें, एवढीच तेव्हां त्याची

इच्छा होती. त्यामुळें नवीनाला काय उत्तर द्यावे हें त्याला सुचेना. पण नवीनानें त्याच्या मौनाचा अर्थ आपल्या मनांतील विचाराप्रमाणें लावून म्हटलें,

“ नलिनीकांत, तुम्हांला काय पाहिजे हें मला माहीत आहे. पण नलिनीकांत ”– नवीन कळवळून म्हणाला, “ माझें निर्मलेवर निरतिशय प्रेम आहे ! ”

“ आणि, माझे ? नवीनबाबू , तुम्ही निर्मलेच्या प्रेमासाठीं कोठलें दिव्य केलेत, सांगा पाहूं ! तुमच्या प्रेमाला अजून कसच लागला नव्हता. आणि पहिल्याच प्रेमाच्या परीक्षेबरोबर, तुम्ही कचरलांत; आणि मी ! निर्मलेच्या प्रेमासाठीं स्वदेश, स्वजन, स्वहित यांचा होम करून—”

“ समजलें; समजलें; नलिनीकांत, तुमचें निर्मलेवरील प्रेम, तावूनसुलाखून निघालेलें असल्यामुळें माझ्या प्रेमापेक्षां जास्त शुद्ध आहे, हें मी कबूल करतों. पण, माझेंहि प्रेम कसोटीला उतरणार नाहीं असें समजूं नका. नलिनीकांत, ” नवीन खुर्चीवरून उठला, “ निर्मलेच्या सुखासाठीं मी आतांच्या आतां, असाच्या असा, तुमच्या मार्गांतून निघून जातों. तुमचें निर्मलेवर प्रेम आहे; तिचेंहि तुमच्यावर आहे, हें कालच्या प्रसंगावरून स्पष्ट झालें आहे. दोघेहि सुखानें रहा. माझें अप्रिय दर्शन तुम्हांला पुन्हा कधींहि होणार नाहीं. ”

नवीन आवेशानें दाराकडे चार पावलें गेला. निर्मला व वेडा खुर्चीवरून ताडकन् उठून उभीं राहिलीं. निर्मला कांहीं बोलण्या-

पूर्वीच, वेड्यानें पुढें होऊन नवीनाचा हात धरला व काकुळतीस येऊन म्हटलें.

" नका नवीनबाबू, निर्मलेला सोडून जाऊं नका. या रत्नाला घेऊन मी भणंगभिकारी काय करूं? ऐहिक ऐश्वर्यें सेवेला उभीं करून निर्मलेला पूर्णपणे सुखी करण्याचें सामर्थ्य प्रेमाच्या प्रबल विकारानें खिळखिळया झालेल्या माझ्या या दुबळया शरीरांत व बुद्धींत नाहीं. तुमच्यासारख्या समर्थ कर्णधाराच्या नेतृत्वाखालीं निर्मलेची संसार-नौका आनंदाने विहार करूं द्या. मला फक्त तिच्या सतत सेवेची भिक्षा घाला. "

" नलिनीकांत " नवीन दोन पावले मागे येऊन, हेटाळणीच्या आवाजानें म्हणाला, " तुमची प्रेमाची कल्पना मोठी अजब दिसते. तुमच्या दुबळया व कर्तृत्वहीन प्रेमाच्या आधारानें निर्मला सुखी होईल, असे मला तर वाटत नाही. पण, हा प्रश्न निर्मलेच्या खुषीचा आहे. बोल, निर्मले, आपली न्यायनिष्ठुर नजर निर्मलेकडे भिडवून नवीन उद्गारला, " तुला कोणाचें प्रेम स्वीकारायचें आहे– माझें कीं तुझ्या वेड्याचें ? "

निर्मला एखाद्या कमलपत्राप्रमाणें थरथर कांपूं लागली. असहाय-पणे आपले दोन्ही हात दोघांकडे पसरून ती कातरस्वरानें उद्गारली.

" दोघांचेहि– तुमच्या दोघांच्याहि प्रेमाशिवाय माझ्या स्त्रीहृद-याच्या आकांक्षा पूर्ण होणार नाहींत. "

नवीननें मान हलवली. " निर्मले; असें उडवाउडवीचें उत्तर

चालणार नाहीं. बोल, तुला माझ्या प्रेमाची जरूर आहे का नाहीं ?"

"नाथ" निर्मला करुण वाणीनें म्हणाली. "आपण माझ्या जीवनाचे आधार. आपल्याशिवाय मी कशी राहूं शकेन ?"

"नलिनीकांत, निर्मलेचें उत्तर ऐकलेंत ना ? दरवाजा उघडा आहे." नवीन विजयी मुद्रेनें म्हणाला.

"निर्मले, निर्मले," वेडा असहायपणें निर्मलेच्या पायास बिलगून म्हणाला. "तुझ्या वेडयाला असा मोकलूं नको. तुझ्या सतत सेवेची भिक्षा मला घाल.

निर्मलेचें कोंवळे स्त्रीहृदय द्रवले. वेडयाच्या मस्तकावर सस्नेह हात ठेवून ती म्हणाली, नवीन, वेडयाला मला ढकलून देववत नाहीं. तुम्ही माझ्या जीविताचे आधार म्हणून जसे मला हवेत, तसाच या वेडयाच्या जीवनाचा मी आधार, म्हणून हाहि मला हवा. मी तुमची दासी आहें. पण, माझ्यासाठीं व या वेडयासाठीं त्याची स्वामिनीहि मला झालें पाहिजे. स्त्रीहृदयाची आत्मार्पण करण्याची हौस तुमच्या-पाशीं मी पुरी करून घेईन. पण स्त्रीहृदयांत, दुसऱ्या एका प्रेमी हृदयावर स्वामित्व गाजवून आपल्या पायाशीं त्याचें आत्मार्पण करून घेण्याची हौसहि पहिलीइतकीच प्रबल असते. ती हौस पुरी करून घेण्यासाठीं या वेडयाला माझ्या सतत सेवेची भिक्षा घातलीच पाहिजे.

"निर्मले," नवीन उत्तरला, "मला स्त्रीहृदयाचीं कोडीं उल-गडत नाहींत; पण तुलाहि माझ्या प्रेमाचें स्वरूप समजलें नाहीं, असें दिसतें. निर्मले, माझें प्रेम स्वार्थी, आपलपोटें आहे, असें तूं वाटलें

तर म्हण. पण माझ्या प्रिय वस्तूच्या प्रेमांत, दुसऱ्या कोणाला इव-लासा वांटाहि देण्यास मी तयार नाहीं. दोन प्रेमी जीवांचें आत्मार्पण एकमेकांतच झालें पाहिजे. म्हणून म्हणतों, निर्मले, बोल, तुला कोणाचें आत्मार्पण पाहिजे, माझें कीं या वेडयाचें ?"

निर्मलेनें दीनमुद्रेनें नवीनपुढें गुडघे टेकून एका हातानें त्याच्या पायाला विळखा घातला. पण तितक्यांत वेडयाचा केविलवाणा चीत्कार ऐकून तिने वळून वेडयाच्या मस्तकावर पुन्हां सस्नेह हात ठेवला; व दोघाकडे आळीपाळीनें पहात ती कातर स्वरानें उद्गारली.

"समजत नाहीं ! समजत नाहीं मला !!"

# हृदयशारदा

दाराबाहेरील विजेच्या घंटेचा खण्खण् असा आवाज माझ्या खोलीत दुमदुला. मी माझ्या खोलींतील अव्यवस्थित पडलेल्या एकदोन वस्तु नीटनेटक्या ठेवल्या व पाहुण्यांचें स्वागत करण्याकरतां सस्मित होऊन उभी राहिलें. सरला दरवाजांत येऊन उभी राहिल्या-बरोबर माझ्या मनात हजारो विकार एकदम उचंबळले व आश्चर्याचा व आनंदाचा उद्गार न कळत माझ्या तोंडून निघून गेला. तिचा हात प्रेमाने धरून मी तिला एका मऊ गादीच्या कोचावर आणून बसवलें व आम्ही दोघींहि एकमेकींकडे टक लावून पाहूं लागलो. पण थोडयाच वेळांत सरलेची माझ्या तोंडावर खिळलेली दृष्टि सहन न होऊनच कीं काय, माझी मान खालीं वळली व माझ्या हातांत अस-लेल्या तिच्या हाताच्या बोटाशीं मी खेळूं लागले.

सरला माझी जीवाभावाची मैत्रिण होती; म्हणून माझें हृद्गत जाणण्याचा प्रेमळ हक्क तिला होता. तिच्या स्पष्टवक्तेपणामुळें ऊर्फ फट-कळपणामुळें तिचेहि हृद्गत मला समजण्यास कधी वेळ लागत नसे. माझें हृद्गत जाणण्यासाठीं व त्यावरील आपलें मत स्पष्ट बोलून दाखवण्यासाठीच सरल आज आली होती हें मला माहीत होतें. या तिच्या भेटीला मी जितकी उत्सुक होतें तितकीच भीतहि होतें. सरलेच्या मनमोकळया हृदयाचें आपण तेव्हांच समाधान करूं अशी

माझी खात्री असूनहि तिच्या त्या हृदयभेदी पहिल्या नजरेला मी भ्यालें व खालीं मान वळवली. सरलेला मी तिची नजर चुकवीन अशी कल्पना असावी, असें दिसत होतें. कारण तिच्या दृष्टीनें मी फारच मोठा अक्षम्य अपराध केला होता.

माझ्यासारख्या वीसएकवीस वर्षे वयाच्या प्रौढ मुलीनें एखाद्या तरुण बिजवराशीं विवाह केला तर त्यांत एकंदर जगाच्या दृष्टीनें कांहीं मोठी चूक होती, असे नाहीं. पण सरलेल्या दृष्टीनें मात्र तो एकप्रकारचा गुन्हा– एकप्रकारचा प्रतिज्ञाभंगच होता. सरल व मी कॉलेजांत प्रीव्हिअसमध्यें एकत्र शिकत होतों तेव्हांपासून आम्हीं दोघींनीं बिजवराशीं लग्न करायचं नाहीं, असा निश्चय केला होता; आणि तेव्हांच्या यौवनसुलभ उत्साहाला अनुसरून आम्हीं तशा शपथाहि घेतल्या होत्या. माझी शपथ बेलाशक मोडून मी बिजवराशीं लग्न केलेलें पाहून सरलनें गोंधळून जाणें व अतिशय रागावणें अगदीं साहजिक होते. माझें लग्न झालें तेव्हां सरल आपल्या आजोळीं गेली होती; त्यामुळें तिच्या निषेधाच्या प्रत्यक्ष माऱ्यांतून मी तात्पुरती सुटलें होतें. पण, मी भीतभीत पाठवलेल्या निमंत्रणचिठ्ठीला एका ोटाएवढ्या चिठ्ठीचेंहि उत्तर न आल्यामुळें ती किती रागावली असेल, याचा अजमास मला करतां येत होता. माझ्या लग्नाला एक महिना झाला तरी सरलेला पुण्यांत पत्ता नव्हता. तेव्हां अचानक आज अशी तिला आलेली पाहून आश्चर्य, आनंद व भीति या भावनांचा माझ्या मनांत गोंधळ उडावा यांत कांहीं आश्चर्य नव्हतें.

सरलेचा आत्यंतिक भावनाप्रधान स्वभाव मला माहित होता. कोणतीहि भावना तिच्या मनांत एकदां उद्भूत झाली कीं तिचें हृदय ती अगदी पुरेपूर व्यापून टाकीत असे. सरल माझ्यावर रागावण्याचा प्रसंग अद्यापि कधी आला नव्हता; पण दुसऱ्यावर अतिशय रागावलेली अशी मी तिला अनेकवार पाहिली होती. त्यामुळें माझी नजर खाली वळलेली असूनहि तिची तीव्र दृष्टि माझा भालप्रदेश जणूं होरपळून टाकीत आहे असा मला भास होत होता. तिनें आपल्या हातांत धरलेला माझा हात हळूहळू जास्त जास्त दाबला जाऊं लागला; व शेवटीं क्रोधानें अस्फुट झालेल्या आवाजात तिने केलेला प्रश्न माझ्या कानीं आदळला.

" नलिनी, काय ग करून बसलीस हें ! आपली प्रतिज्ञा... "

सरलेला पुढें बोलवेना. तिच्या क्रोधाला, अर्धवट कां होईना—एकदां वाट मिळालेली पाहून मला बरें वाटलें. आतां आपल्याला हळहळू हिची समजूत घालता येणें कांहीं फारसें कठीण नाहीं अशी माझी खात्री होती.

" सरल, मी आपली प्रतिज्ञा विनाकारण मोडीन, असें तुला वाटलें तरी कसें ? वाच्यार्थानें मी कदाचित् ती मोडली असेल, पण तिच्या तत्त्वाच्या मात्र मी विरुद्ध गेलेली नाहीं. "

सरल शुष्कपणें हंसत म्हणाली " आपला शब्द मोडणाऱ्या लोकांची ठराविक लंगडी सबब आणलीस पुढें ! "

" नाहीं, सरल, ऐकून तर घे माझं बोलणं नीटपणें, " मी

चादाच्या आवेशांत येऊन म्हणाले. "आपण बिजवराशीं लग्न न करण्याची कोणत्या तत्त्वावर प्रतिज्ञा केली होती ? आपण नेहमीं म्हणत असूं कीं लग्नाचा उद्देश काय हे प्रत्येक मुलगी जर नीट ध्यानांत आणील तर ती कधींहि बिजवराशीं लग्न करण्यास तयार होणार नाहीं. प्रत्येक विचारी, समंजस मुलीच्या काही विशिष्ट आकांक्षा व ध्येये असतात. ती पुरीं करण्याला जोडीदार व मदत-नीस मिळावा म्हणून ती लग्न करते. अर्थात् तिच्या जोडीदारानें तिच्याचइतक्या उत्साहाने ध्येयपूर्तीसाठीं विश्वांगणांत उडी घ्यावी अशी तिची हौस असणारच. ही हौस प्रथमवर तरुणांशिवाय पुरी होणें शक्य नाहीं. बिजवराचें संसारासूत्र एकदां सुरळीत सुरू होऊन मध्येच तुटून गेलेले असतें. त्याच्या आकांक्षा पूर्ण होण्यासाठीं त्यानें निवडून काढलेली समानशील जोडीदारीण संसाराच्या अर्ध्या डावां-तून उठून गेलेली असल्यामुळें त्याचा सगळा उत्साह विरून गेलेला असतो. अशा भग्नोत्साह माणसाशीं नव्या दमाच्या तरुण मुलीनें लग्न करून काय फायदा ?—असे आपण नेहमीं म्हणत असूं, नाहीं का ?"

"पण, नलू, हें सगळें आतां मला सांगून काय फायदा ?—हो, बाकी नाहीं म्हणायला, तूं आपली प्रतिज्ञा झुगारून दिली असलीस तरी तिचें तत्त्व तुझ्या लक्षांत आहे हें एकप्रकारचें मनाचें समाधानच म्हणायचें ! पण यामुळें 'वचस्येकं मनस्येकं कार्यमन्यत्' या न्यायानें तूं जास्तच दोषी ठरतेस नाहीं का ?" सरला खिन्नपणें म्हणाली.

" गडे सरल, काय तरी तुझा हा उतावळा स्वभाव " मी किंचित् लाडिकपणे तिच्या गालावर चापटी मारून म्हटलें. आपलें म्हणणें आपण पूर्णपणे सिद्ध करून दाखवूं अशी माझ्या मनाला खात्री पटत चालली होती. " तेव्हां आतां माझें असे म्हणणें कीं, ज्याच्या आयुष्यांतील आकाक्षा व ध्येये योग्य जोडीदार न मिळाल्या मुळे मृतवत् पडून राहिलीं होतीं अशा बिजवर तरुणाशीं, त्याच्या त्या आकाक्षा संजीवनीमंत्राने फुंकून जागृत करण्यासाठीं, लग्न करण्यास काय हरकत आहे ! मी तर असेहि म्हणतें कीं अशा बिजवराशीं लग्न करणें हे प्रथमवराशीं लग्न करण्यापेक्षाहि आपल्या तत्त्वाला जास्त खुलून दिसेल. कसं वाटतं तुला सरल ? " मी तिच्या तोंडाकडे आशेने पहात विचारले.

सरलेच्या चेहऱ्यावरून तिला माझें बोलणें पटत असावें असें दिसले. ती चटकन् मनमोकळेपणानें म्हणाली.

" तत्त्व आहे ग तुझं बरोबर; पण तपशिलाची काय वाट ? ही तुझी चर्पटपंजरी आपला अपराध लपविण्यासाठीं तूं काढलेली पोकळ सबब नव्हे कशावरून ? काहींतरी प्रत्यक्ष प्रमाणाशिवाय हा तुझा सिद्धांत माझ्या मनाला कसा पटणार ? " असें म्हणून सरल हंसत हंसत माझ्या चेहऱ्याकडे टक लावून पाहूं लागली. माझी मान आपोआपच खालीं गेली. सरल माझी कितीहि जीवाभावाची मैत्रिण असली तरी माझ्या व माझ्या पतींच्या मनाची मिळवणी कशी झाली हे तिला पहिल्याच झटक्यास मी कसें समजून देणार ! हा

विषय इतकाच ठेवावा, असें मला वाटूं लागलें. सरलेचा माझ्या-वरचा तीव्र राग बराच कमी झाला, हें काय थोडें झालें ! आणखी केव्हांतरी तिला पूर्ण खात्री पटवून देतां येईल. विषय कसा बदलावा याचा विचार करूं लागले. सरलेलाहि माझ्याचसारखें वाटत असावें असें दिसलें. तीहि नवीन विषय काढण्याचा प्रयत्न करीत होती.

आम्हां दोघींचीं मने मोकळीं नसल्यामुळें प्रथम माझ्या खोलींत जसें कांहीं एकप्रकारचें कोंदट वातावरण उत्पन्न झाले होते; तें जरासें वितळल्यामुळेंच जणूं काय एकप्रकारचा मंद गारसा वारा आमच्या अंगांना सुखकारक स्पर्श करूं लागला. सरलेने त्याच्या गोड शिर-शिरीसरसे अंग थरारवन म्हटलें, " अहाहा, काय छान वारा येतोय ग तुझ्या खोलीत. " खोलींत जरा इकडे तिकडे फिरून तिनें खिडकींतून डोकावलें व बाहेरच्या मनमोहक देखाव्यावर डोळे स्थिरा-वून उद्गार काढले, " फारच सुंदर ! फारच सुंदर जागा शोधून काढली आहे अं तुम्ही आपलें घर बांधायला. " हा नवीन व दोघींना प्रिय असा विषय निघालेला पाहून मला जरा बरे वाटलें. नूतनविवाहित गृहीणीला आपल्या नवीन संसाराचा किती अभिमान असतो हे काय सांगावयास पाहिजे ? चटकन् उठून मी सरलेचा हात धरला व उल्हासानें म्हणालें, " चल, चल गडे. मी तुला आमचं सगळं घर दाखवतें. " माझ्या ' आमचं ' या शब्दावर खोडकर सर लेनें डोळे मिचकावलेच पण त्यामुळें माझा उत्साह द्विगुणित झाला. जिव्हेचें व मनाचें दडपण सैल झालें व हर्षानें डवरून माझ्या

घराच्या एका दालनांतून दुसऱ्या दालनांत मी तिला हिंडवूं लागलें.

सरला रसिक होती व तिची निरीक्षणशक्तीहि दांडगी होती. त्यामुळें प्रत्येक दालनांतील एखादी चमत्कृतिजनक वस्तु किंवा एकंदर सामानाची मोहक माडणी तिच्या डोळयांत तेव्हांच भरत होती व त्याची ती मार्मिकपणे स्तुति करीत होती. आमचें घर कलाकुसरीच्या अनेक सुंदर कामांनी परिपूर्ण भरलेलें होतें. एका दालनांतील टेबलावरच्या एका मोहक डिझाइन्च्या रुमालाकडे पहात सरल बराच वेळ उभी राहिली; आणि त्या सुती रुमालाचा कांही भाग दोन्ही हातात धरून तो निरखून पहात ती म्हणाली.

"शाबास बाई नलिनी तुझी! अग हे एवढं सगळं तूं केलंस तरी केव्हां? आम्ही आपली तुला पुस्तकातला किडा समजत असूं. पण आपला भावी संसार थाटण्यासाठीं ही एवढी कडेकोट तयारी तुझी चोरूनमारून सुरू होती म्हणायची?"

"अग, छे" मी निष्काळजीपणें उद्गारलें. "हा एवढा खटाटोप करायला मला होता कुठें वेळ! आणि वेळ खर्चून हातांनीं करायची मला फारशी आवड नाहीं, हें ठाऊकच आहे कीं तुला!"

"हं, हं, मग आयतं आणवलं असशील." सरलेनें किंचित् आंबट तोंड करून म्हटलें. "पण, निदान, या कलाकुसरीच्या कामांनीं सर्व घर इतक्या सुंदर व नाजूक रीतीनें शृंगारण्याची चतुराई तरी तुझीच ना!"

"नाहीं बाई" मी किंचित् वरमून उत्तर दिलें. "हातचींच

आहेत हीं सगळीं कामं. या घराच्या पहिल्या मालकिणीन हीं सगळीं सुंदर कामं केलेलीं आहेत, अन् ही मांडणावळीची कुसराईहि तिचीच आहे. मी या घरांत आल्यापासून इकडची काडीहि तिकडे उचलून ठेविली नाहीं. आहे सगळं चागलं, मग कशाला बदलायचं, नाहीं का ? आणि माझे दुसरे व्यवसाय काय मला थोडे आहेत ! ”

सरला कांहींच बोलली नाहीं. आतां काय दोन तीनच खोल्या दाखवायच्या राहिल्या होत्या. त्या दाखवतांना अर्थातच माझा पहिला उल्हास बराचसा ओसरला होता. सरलाहि आता पूर्वीसारखी मन-मोकळी स्तुतिपर बडबड करीत नव्हती. मात्र पूर्वीपेक्षाहि जास्त लक्ष-पूर्वक ती प्रत्येक वस्तु पहात होती. होता होता शेवटी मी याच्या खोलीपाशीं आलें. खोलीच्या दारावर फिकट हिरवा पडदा बाजूला सारून उल्हासानें मी सरलेला म्हणालें,

“ ही बघ यांची लिहिण्यावाचण्याला बसण्याची जागा ” खोलीत सभोंवार नजर टाकून, तेथील किंचित् उदासवाणें पण माझ्या दृष्टीला अत्यंत गंभीर, उदात्त व प्रशांत दिसणारें वातावरण निगूढ श्वसनानें हृदयांत ओढून सांठवून ठेवण्याचा प्रयत्न करीत मी म्हटलें; “यातली सर्व व्यवस्था मात्र नवीन व खुद्द माझ्या हातची आहे. ” पण सरलेच्या तोंडाकडे नजर टाकताच माझा उत्साह पुन्हां विरून गेला. खोलींतलें वातावरण एक प्रकारच्या हेटाळणीच्या नजरेने सरल न्याहाळीत आहे, असा मला भास झाला. ती धिम्मेपणानें एका पुस्तकांच्या कपाटाजवळ जाऊन उभी राहिली व पुस्तकांच्या पृष्ट-

भागांवरील सोनेरी अक्षरांनीं लिहिलेल्या नांवांवर नजर फिरवूं लागली. पुस्तकांशिवाय आकर्षक अशी दुसरी वस्तु त्या खोलींत नव्हती खरीच पण वाङ्मयोपासकाच्या मंदिरांत उत्तमोत्तम ग्रंथांशिवाय, दुसरी छानछोक दिसणारी वस्तु आणणें म्हणजे त्याच्या आराध्य-देवतेचा अपमान करणें आहे, असें मला मनापासून वाटत असे. सरला मुकाट्यानें एका कपाटाकडून दुसऱ्या कपाटाकडे अशी हिंडत होती. मध्यवर्ति टेबलाच्या एका खुर्चीवर बसून, माझ्या आवडत्या गुळगुळीत व चकचकीत पॉलिश केलेल्या, चमकत्या तावदानांच्या उंच उंच कपाटांकडे मी शून्य दृष्टीनें पहात होतें. हिंडतां हिंडतां सरल खोलीच्या कोपऱ्यांतील एका छोट्या टेबलाजवळ आली. टेबलावरील सुरेख बाह्यांगाची एक जाडशी पुस्तकवजा वही उचलून, पाने उल-टण्यास तिनें सुरूवात केली व पहाता पहातां आश्चर्यानें व आनंदाने एकदम ओरडून ती म्हणाली.

" हें काय ग ! काय लबाड आहेस तरी ! पतिराज कवि आहेत, हें नुसतं सांगितलंस सुद्धां नाहीं ! "

एका आरामखुर्चीवर घाईघाईनें लवंडून ती मधून मधून पानें उलटून वाचूं लागली.मला जरासें बरें वाटलें. टेबलावर दोन्ही बाहू ठेऊन त्यावर मी माझें डोकें टेकले व मान वळवून सरलकडे पाहूं लागलें. पण अजूनहि माझ्या हृदयांतील कशामुळें तरी आलेला जडपणा कमी झालेला नव्हता. ती जाडशी सुंदर वही माझ्या एका महिन्याच्या हौनेनें केलेल्या परिश्रमाचें फळ होतें. माझें लग्न झालें

तेव्हां माझ्या पतीच्या अनेक सुंदर कविता कोठेंतरी निरनिराळ्या कपाटांतून धूळ खात पडल्या होत्या; त्यांचें संशोधन करून लेखन-काल निश्चित करून, क्रमवार अशा वहींत मी माझ्या हातानें गोडशा लिहून काढल्या होत्या पण हें सरलला सांगण्याचा धीर मला होईना. तिच्या हेटाळणीची मला भीति वाटत होती. जवळ जवळ अर्धा तास सरल पानें चाळीत होती. नंतर वही मिटून सरलेने माझ्याकडे पाहिलें व आपल्या मिस्किल डोळ्यात गूढ निराशेचा आविर्भाव आणून मान हालवीत, एक जड निश्वास सोडून ती म्हणाली.

" लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं ग बाई तुझ्या नवऱ्याचें ! "

मला तिचा तो आविर्भाव पाहून हसूं लोटलें.

" काय ग झालं सरल ? "

"अग" कृत्रिम गंभीरपणाने हातातील वहीवर बोट टेकीत सरला म्हणाली; " अग वेडे, तुझ्या यजमानांनीं, या चोपडींतील एकुणएक पानावर कोणा एका रमणीचीं अनेक मनमोहक चित्रं रेखाटून ठेवलीं आहेत. या सुंदर भूतानें झपाटलेले तुझे पतिराज......कसं होणार तुझं समजत नाहीं बाई मला ! "

सरल थट्टा करीत होती हे मला समजत होतें. काव्यमय सृष्टींत विहरणारी, काव्याची केवळ मूसच, अशी अव्याजमनोहर प्रिया प्रत्येकच कवीच्या काव्यांत आढळते. पण जवळजवळ नेहमींच या प्रियेचें अस्तित्व केवळ कवीच्या कल्पनासृष्टींतच असल्यामुळें हा बहु-भार्यत्वाचा गुन्हा, सत्यसृष्टींतल्या पत्नीचा लटका मत्सर जागृत कर-

णारा असला, तरी कायद्याच्या दृष्टीनें पाश्चात्य कवींनांसुद्धां माफच असतो, ही गोष्ट मला व सरलेला सारखीच माहीत होती. पण कां कोण जाणे, सरलेचा प्रत्येक शब्द, कांहीं एका भावनेनें हळुवार झालेल्या आजच्या माझ्या हृदयाला टोचूं लागला. अस्वस्थ होऊन कावऱ्याबावऱ्या नजरेनें, खोलीच्या भिंतीवर टांगलेल्या एका फोटो-कडे मी चोरटी दृष्टी फेंकली. तो फोटो सुंदर होता......आमच्या घरांतलें वातावरण सुंदर होतें;......मी सुंदर नव्हते,...आपल्या भोंवतीं सुंदर वातावरण उत्पन्न करण्याची शक्ति माझ्यात नव्हती;... ही तुलना आजपर्यंत माझ्या हृदयांत कधीं उद्भूतहि झाली नव्हती. माझ्यांतला हा उणेंपणा आजपर्यंत मला कधीं जाणवला नव्हता. अस्फुटपणें जाणवला असला तरी निदान त्याबद्दल मला अशी हुरहूर तरी कधीं लागली नव्हती.

सरल, आपल्या विनोदी भाषणाला माझ्या तसल्याच उत्तराची वाट पहात आहे, हें ध्यानांत आलें. खिन्नपणें हास्याचा देखावा करून कांहींतरी बोलावयाचें म्हणून मी म्हटलें.

" सरल, इतकी काळजी नको हो करायला. त्या सुंदर रमणी-पासून मला याच्यापुढं कसलीहि भीति बाळगावयाचें कारण नाहीं."

" म्हणजे " माझ्या चमत्कारिक उत्तराचें सरलेला आश्चर्य वाटून ती म्हणाली.

" हीं सुंदर शब्दचित्रें " एकएक शब्द मोठ्या कष्टानें माझ्या जिभेवरून खालीं पडत होता—" हीं सुंदर शब्दचित्रें आमचें घर

सुंदर करून ठेवणाऱ्या व्यक्तीमुळेंच निर्माण झालेली असावींत....”
पुढे मला बोलवेच्चना. माझा भाव व्यक्त करण्यासाठीं मी मघाच्या फोटोकडे बोट दाखविलें. सरलेने घोटाळून वळून पाहिलें. माझा भावार्थ ध्यानात येऊन ती उठली व फोटो जपून खालीं काढून त्याचें ती निरीक्षण करूं लागली.

तो फोटो माझ्या सपत्नीचा होता. माझी सवत अत्यत, अत्यंतच सुंदर होती....पुन्हा माझ्या हृदयाला वेदना होऊं लागल्या. हा मत्सराचा परिणाम का ? सौंदर्याचा मत्सर ही भावना माझ्या हृदयाला अजून अननुभूत होती. लालसेशिवाय मत्सराचा उद्भव होणें शक्यच नाहीं. सौंदर्याची तहान माझ्या हृदयाला कशी व केव्हा लागली ?

सरलेनें आपल्या तीव्र व मार्मिक नजरेनें माझ्या सपत्नीचे लावण्य पुरेपूर न्याहळिले, व माझ्याकडे नजर वळवली. तिच्या त्या तीक्ष्ण हृदयाचा ठाव घेणाऱ्या दृष्टिक्षेपात जो प्रश्न सूचित होत होता, त्या प्रश्नाचा माझ्या हृदयांत आधीच उद्भव झाला आहे, असें माझ्या ध्यानांत आलें. त्यामुळें तिनें आपला प्रश्न उच्चारण्याच्या आधीच तो काय असावा, हें मला समजलें होतें. आपला भ्रूभाग शक्य तेवढा उंचावून कठोर स्वरानें तिनें मला प्रश्न केला.

“ नलिनी, तुझी मघांची सबब पोकळ होती, हें आता आपोआपच सिद्ध झालें नाहीं कां ? प्रथमविवाहानें ही असली भुवनसुंदरी पत्नी अन् हा असला दृष्ट लागण्याजोगा संसार लाभला अस-

ताना, तुझ्या पतिराजांच्या कोठल्या बाई आशाआकांक्षा अतृप्त राहिल्या होत्या ? ”

हे असेच शब्द माझ्या हृदयांत यावेळीं निनादित होत होते. माझ्या हृदयाची समजूत सावकाशपणें घालायचा मी प्रयत्न केला असता, पण सरलेची समजूत ताबडतोब घालणे अवश्य होतें. पण जो स्वतःच संशयात्मा, तो दुसऱ्याचें संशयनिरसन कसें करणार ? सरलेला जे कांहीं सांगावयाचें म्हणून आज मी महिनाभर हृदयाशीं जपून ठेवलें होतें, तें आतां मी शोधूं लागलें. पण माझ्या हृदयाच्या अंधारांत आता ते मला कसें सांपडणार ! जो विषय सरलेपाशी मी स्वस्थपणे काढून अत्यंत नाज़ूक रीतीनें उलगडून दाखवणार होते, तो आतां कसा तरी गोंधळलेल्या मनोवृत्तीनें काढून मी त्याच्याशीं ओढाताण करूं लागलें.

“ सरल, तूं म्हणतेस तें खरें. ऐहिक पूर्णसौख्याला जरूर असणाऱ्या– सामान्य लोकांच्या दृष्टीने जरूर असलेल्या– दोन गोष्टी, सुंदर पत्नी व सुंदर संसार या त्यांना प्राप्त झाल्या होत्या खऱ्या. पण माझे पति, इतर पुरुषांप्रमाणें नुसते रुक्ष संसारी, व्यवहारी नसून, सहृदय, सौंदर्याचे भोक्ते कवि आहेत. अशा पुरुषाला पत्नी कशी असावी बरं !—”

मी घोटाळून थांबले. माझा विषयाचा प्रस्ताव सरलेचें मत सरलेचेच मत सिद्ध करीत होता, नाहीं कां ! सरलेची, माझी कींव करणारी नजर माझ्याकडे रोखलेली असतांना, मला सुसंगत बोलण्यास

कसें सुचणार ? बुडत्या माणसांप्रमाणें शेवटच्या काडीचा आधार मी बोजडपणानें जवळ केला.

हें बघ सरल,...यांची पहिली पत्नी अशिक्षित होती,– त्यामुळें त्यांची बौद्धिक सहवासाची हौस पुरली नाहीं.–त्यांच्या कविता तिला समजत नसत... "

ज्या नावीन्यपूर्ण, मोहक तत्त्वाला भुलून, माझी प्रतिज्ञा मोडून, मी विवाह केला, तें तत्त्व आतां माझ्याच दृष्टीला हास्यास्पद व नकली भासूं लागलें. मग सरलेला ते तसे वाटलें यांत नवल नाहीं.

" काय म्हणतेस, तुझ्या सवतीला तुझ्या पतिराजांच्या कविता समजत नसत ? " सरलेनें पुन्हां फोटोकडे लक्षपूर्वक पहात प्रश्न केला. बराच वेळ पाहून तिनें मान वर केली व माझ्याकडे बघून संथ स्वरानें ती उद्गारली.

" नसतील कदाचित् हिला तुझ्या यजमानांच्या कविता समजत ! पण ही तुझी सवत, स्वतःच एक सुंदर कविता होती, यात कांहीं संशय नाहीं, बाई !... "

* * * *

सरल जातांच माझ्या खोलींत जाऊन दार घट्ट लावून घेऊन मी खुर्चीवर बसले– नव्हे पडलेच. माझें शरीर, मस्तक, हृदय सुन्न होऊन गेलें होतें. बाह्य सृष्टीची जाणीव माझ्या इंद्रियांना अंधुकशी होत होती; पण माझें हृदय व बुद्धि मात्र त्या बाह्यसृष्टीपासून कोठेंतरी दूरदूर जाऊन पडलीं होतीं. मला विचार करून, हे झालें काय व

कसें झालें याची छाननी करायची होती. पण माझ्या सुन्न हृदयांत विचारांचें सुसंगत सूत्र सुरू होईनाच. माझें डोकें भ्रमण करीत होतें. त्याच त्याच शब्दांची, त्याच त्याच प्रश्नोत्तरांची वेडावून टाकणारी पुनरावृत्ति न कळत माझ्या डोक्यांत चालली होती. सरला आपल्या समोरच्या खुर्चीवर बसून उपहासानें बघत आहे, व आपण अगदीं कासावीस होऊन तिचे समाधान करण्याचा प्रयत्न करीत आहों, असा मला सारखा भास होत होता.

“ गडे सरल. ” मी अगदी काकुळती येऊन म्हणत होतें. “ ती सुंदर होती खरी; तिच्या सौंदर्यानें यांना काव्यस्फूर्ति होत असे हें खरें; पण सुंदर कविता लिहून झाल्यावर ही कुणाला वाचून दाखवूं असा त्यांना प्रश्न पडत असे ग ? ”

सरला हेटाळणीच्या आवाजाने म्हणे. “ हं, अन् आतां सुंदर कविता कुणावर लिहूं म्हणून त्याना प्रश्न पडत असेल. अग, सुंदर कवितेचे कौतुक एखादा सहृदय मित्रहि करतो; पण काव्यस्फूर्ति होण्याला मात्र सुंदरशी पत्नीच लागते. ”

“ सरल ” मी पुनः प्रयत्न करी. “ ते ज्या उच्च, शुद्ध सौंदर्यानें भरलेल्या वातावरणांत काव्यशक्तीच्या आधारानें भरारी मारीत, त्याचें आकलन करण्याची बुद्धि त्यांच्या अशिक्षित पत्नीच्या ठिकाणीं कोठून सांपडणार ? ”

सरला कपाळाला आठी घालून म्हणे. “ त्या सौंदर्यमय वातावरणाचें दूर राहून, बुद्धीनें रुक्ष आकलन करण्यापेक्षां, त्या वातावरणाच

केंद्रीभूत, सौंदर्य स्वरूप, प्राणच झालेलें कितीतरी श्रेष्ठ !"

"सरल" मी रडकुंडीस येऊन म्हणाले. "सौंदर्यलक्ष्मी चचल असते. संसाराच्या प्रथमारंभींचा वसंतऋतु संपून गेल्याबरोबर त्यांच्या उरलेल्या सगळ्या आयुष्याचा उन्हाळा झाला नसता का ?"

सरला खो खो हंसून म्हणे. "अग, एका वसंतऋतूनेच उभ्या सवत्सराचे सार्थक होते ! तुझ्या बुद्धीच्या थंडगार कठोर हिमकणांच्या वर्षावाने मात्र तुझ्या पतीच्या हृदयाचे जन्मभर बर्फमय ओसाड वाळवंट बनून राहील !!"

माझे डोके गरगर फिरूं लागले. खरच–खरंच का माझ्या पतीच्या काव्योत्कर्षाला माझ्यासारख्या बुद्धिमतीची जरूर नव्हती ? काव्यमर्मज्ञ होणे श्रेष्ठ का काव्यमर्मच होणें श्रेष्ठ ? शारदेच्या माझ्यावर झालेल्या प्रसादानें माझ्या पतीच्या काव्यात उमटणाऱ्या हृदयभावनांची चिकित्सा करणारी मी श्रेष्ठ का आपल्या सौंदर्याच्या गोड झुळुकीनें त्यांच्या हृदयवीणेतून मधुझंकार उमटवणारी ती हृदयशारदा श्रेष्ठ ?

बाहेर मोटारीचे शिंग वाजले. जिन्यावर मला परिचित झालेला पदरव ऐकूं येऊं लागला. वर जाऊन वाट पहायची होईल. हें मला माहीत होतें. ऑफिसमध्यें सुचलेले कवितेचे चरण मला दाखवून माझें मत विचारायचें असेल हें रोजच्या क्रमावरून माझ्या ध्यानां होते. पण मला बसल्या जागेवरून उठवेना. एकाद्या दोषी गुन्हे गाराप्रमाणें त्यांना तोंड दाखवायची मला लाज वाटूं लागली. लव करच कवितेचे कांहीं चरण घोळून घोळून म्हटलेले मला ऐकूं आले

" नलिनी, नलिनी, " ते अधीरतेनें मला हांक मारीत होते. पण मी वर कशी जाऊं ? सौदर्यदेवतेनें अधिष्ठित अशा ज्या काव्यमय नाजूक वातावरणांत ते विहार करीत होते त्या वातावरणांत माझ्यासारख्या एकमेव प्रखर बुद्धीने युक्त अशा रुक्ष, शुष्क हृदयाच्या व्यक्तीला प्रवेश करण्याचा काय अधिकार ? माझ्या पतींचें हृदयोद्यान सौंद-र्याच्या गोड, कोंवळ्या उन्हांत हळुंहळूं विकसत होतें. माझ्या चिकित्सक बुद्धीच्या तीव्र तपनानें तीं सुंदर सुमनें अकालीं कोमेजून नाहीं कां जाणार ?

## ाझी बाग

विद्यार्थीदशेंत असल्यापासून माझी जर एक कांहीं महत्त्वाकांक्षा असेल तर ती हीच कीं, आपल्या पायांवर उभे राहूं लागलों कीं एक छानदारशीं हवाशीर बंगली घेऊन तिच्यासमोर टुमदारशीं बाग उठवायची, त्याप्रमाणें पैसा जरासा हातांत खेळूं लागल्याबरोबर मी एक बंगला तर भाड्याने घेतलाच व माझ्या बंगल्यासमोरच्या ऐस-पैस जागेंत वाढत्या उत्साहानें माझ्या बागेची आंखणी करूं लागलों. हाय — ! माझ्या प्रिय बागेच्या जन्मापासून एक वर्षाच्या आंतच तिचा मृत्युलेख लिहिण्याची पाळी येईल हे जर मला माहीत असतें तर माझ्या ताब्यांत असलेल्या भूमातेचा कुसवा मी कष्टवलाच नसता !

माझ्या बागेची जमवाजमव करण्यासाठीं मी जी कांहीं आटोकाट खटपट केली तिची आठवण झाली म्हणजे आतां डोळ्यांना पाणी येते. माझा मूळचा भिडस्त स्वभाव बाजूला ठेवून मला व माझ्या बागवाल्या मित्रांना कंटाळा येईपर्यंत मी त्यांच्या घरीं कलमांसाठीं खेपा घालीत असे. बोटॅनिकल गार्डनमध्यें फिरावयास म्हणून जाऊन, माझा स्वभाव अतिशय सरळ व सत्यप्रिय असूनहि, जाईजुईच्या फांद्या चोरून खुशाल मी खिशात कोंबीत असें. हिंवाळ्यांतील व उन्हाळ्यांतील विशिष्ट फुलझाडांविषयीं व त्यांच्या जोपासनेविषयीं, एरवीं मी ज्यांच्या वाऱ्यालाहि उभा राहिलों नसतों अशा विद्याभ्यास-

जड बोटॅनिस्टांशी मी तासन् तास डोकेंफोड करीत असें. निरनिराळ्या रंगीबेरंगी बियांच्या पुड्यानीं मी आमचें घर म्हणजे एक अजब-खानाच बनवून सोडला होता. अशी सगळी सामुग्री सायासानें एकत्र करून मी माझ्या बागेचा पाया घालण्यास सिद्ध झालों व दोनतीन महिन्यांत मी माझ्या बागेला चागलीच रंगारूपाला चढवली. ऑफिसमध्ये खर्च होणारा वेळ सोडून बाकीचा सगळा दिवस मी माझ्या बागेत घालवीत असें. सकाळीं उठल्याबरोबर पहांटेच्या थंड-गार हवेंत मुखमार्जन करीत माझ्या चिमुकल्या बागेत इकडे तिकडे फिरतांना मला मोठी मौज वाटे. ऑफिस सुटल्याबरोबर मी बागेंत धांव घेतलीच. माझ्या चिमण्या रोपामधून इतस्ततः फिरणे, पुन्हां पुन्हां वाफे साफ करणें, आल्यागेल्याला सकौतुक बागेत फिरवून निर-निराळ्या झाडांची माहिती सागणे हा माझा संध्याकाळचा नित्याचा आवडता व्यवसाय होता. चादणी रात्र असली की माझे पान बागे-तच मांडलें गेलें पाहिजे. माझ्या कोवळ्या फुलझाडाच्या भावी सुमन-संपत्तीने दरवळून गेलेली माझी बाग म्हणजे मला प्रतिनंदनवनच वाटे.

पण माझ्या या नदनवनांतला सर्प लवकरच माझ्या घरांत शिरला. संतू हा सैतान याचा अपभ्रंश असावा असें माझे तेव्हापासून प्रामा-णिक मत झाले आहे. आमच्या संतू गड्यालाहि माझ्याइतकीच किंबहुना माझ्याहूनहि जास्त बागेची आवड आहे असे हळुहळू माझ्या ध्यानांत येऊं लागले. पहिल्यापहिल्यानें मी त्याला माझ्या अपरोक्ष बागेंत पाऊलहि घालूं देत नसे. पण चोरून मारून तो

बागेंत असें काहींतरी छान काम करून ठेवी की पुढें पुढें मी त्याला सरळ सल्ला विचारूं लागलों. एक दिवस माझ्या चौफेर फैलावलेल्या जाईसाठीं त्यानें बांबूच्या काठ्यांचा एक छान, भक्कम डौलदार मांडव करून दिला. आणखी एकदां फुलांनीं लवलेल्या एका गुलाबाच्या ताटव्याला छानदारसा सांवरून धरला. याच सुमारास ऑफिसमधले माझे जोडीदार रजेवर गेल्यामुळें माझें काम दुप्पट वाढलें. तेव्हां नाइलाजाने का होईना पण हळुहळू संतूच्या हवालीं मला माझी बाग करावी लागली. सतू हुशार खराच. त्याने माझ्याइतकीच नव्हे माझ्याहूनहि सरस बागेची व्यवस्था राखली होती. त्यामुळें साहजिकच मी अगदीं निर्धास्तपणे त्याच्यावर बाग सोंपवून ऑफिसच्या कामात गढून गेलो. दमल्या भागल्या जीवाला आराम म्हणून अर्धापाऊण तास काय तो मी बागेंत जाऊन बसत असे.

पण माझ्या नदनवनात शिरलेल्या या गोजिरवाण्या सर्पाच्या पिल्लानें लवकरच आपले विषारी दात दाखवावयास सुरुवात केली. हिंवाळा नुकताच संपत आला होता. आज सात आठ दिवस उन्हाळ्यांतील फुलझाडांची व्यवस्था करण्यासाठीं मी संतूच्यामागें तगादा लावला होता. अशा स्थितींत एक दिवस सकाळीं माझ्या बागेच्या मध्यावरील एक विस्तृत वाफा लहान लहान सातआठ रोपांनीं भरून गेलेला मला दिसला. प्रेमानें जवळ जाऊन मी झाडांकडे वांकून पाहूं लागलों. पण तीं फुलझाडें नसून मवती चहाचीं रोपें आहेत हें लक्षांत घेऊन माझी फार निराशा झाली.

" संत्या " ! मी किंचित् रागानें चढत्या आवाजांत हांक मारली.

" जी रावसाब—" भांडीं घासतां घासतां संतू धांवला.

" संत्या—" मी म्हणालों, " हें काय लावलं आहेस हें ! हीं तुझीं उन्हाळीं झाडं वाटतं ! आठ दिवस लोकांकडे खेटे घालून फारच नामी रोपं आणलीं आहेस बुवा तूं ! "

संतूच्या ओशाळलेल्या चेहेऱ्याकडे पाहून मला फारच जोर आला.

" चल, टाक उपटून तीं सगळीं. आणि उद्यां सकाळला इथं फुलझाडं लागली पाहिजेत. चल, हं उपट—पाहातोस काय ? "

अत्यंत नाखुषीनें संतूनें एका रोपट्याला हात घातला. तोंच आमचें कुटुंब स्वयंपाकघरांतून पोतेऱ्याचें घमेलें घेऊन बाहेर आलें. तुलसीवृंदावनापुढे सडा घालीत माझी पत्नी हळूंच म्हणाली.

" हें काय ? उपटायला काय म्हणून सांगितलीं तीं ? मोठा औषधी असतो हो तो गवती चहा. अन् शिवाय आपलीं तीं उन्हाळीं का फिनाळीं म्हणजे उपटावीं हवीं तर—"

माझ्या पत्नीच्या या अर्धवट आर्जवी व अर्धवट फणकाऱ्याच्या वाक्प्रवाहांत माझा राग अर्धवट वाहून गेला.

" बरं, बरं—राहूं दे—पण मध्यावर प्रदर्शन नको अगदीं. त्या तिकडे कोंपऱ्यांत लावून टाक जा संतू. " असें म्हणून मी मुकाट्यानें तेथून निघून गेलो. संतूच्या या पहिल्या विजयानें पुढे केवढा अनर्थ होणार याची जर मला कल्पना असती तर खात्रीनें मी त्या गवती चहाचीं पाळेंमुळें स्वतः खणून काढलीं असतीं. एकंदरींत देवाच्या

नंदनवनांत सैतानाला ईव्हचें पाठबळ कसें मिळालें असेल याची मात्र मला त्या दिवशीं छान कल्पना आली.

पांचसहा दिवस झाले. अजूनहि बागेत उन्हाळी फुलझाडें लावलीं गेलीं नव्हतीं. कुंड्यांतून टाकलेलीं बीजेंहि अजून अंकुरित होईनात. संतू मुद्दाम हलगर्जीपणा करीत असावा, असा मला संशय येऊं लागला. पण एकदोन महिन्यांच्या आलस्याने शिथिल झालेलें माझें मन मला स्वतः उद्योगी बनूं देईना. पण संतूचा कांहीं निरुद्योगी बसण्याचा विचार नव्हता. एक दिवस मी ऑफिसांतून घरीं येऊन चहा घेत होतो. संतू तिथेंच आतबाहेर करीत होता. जरा वेळानें धीटपणें दारांत उभा राहून, तोंडावर एक प्रकारचें भितरें, आशाळ-भूत हंसूं उमटवून तो म्हणाला.

" रावसाब, तीं उन्हाळीं मिलतच न्हाय पघा—" मी कांहींच बोललो नाहीं. कपाळावर एक आंठी चढवून मी चहाचे भराभर दोन घोट घेतले. ओंजळींत कांहीसें चुरडून तें फुंकीत तो पुढे बोलूं लागला.

" कित्ती रोज झालं,—जागा उगाच पडलीया मंग, वहिनीबाय बी म्हणाल्या कीं—"

इतक्यांत माझी पत्नी हातांत एक बशी घेऊन बाहेर आली. फोडणीच्या पोह्यांवरील हिरव्याचार कोथिंबिरीचा थर चमच्यानें पोह्यांशीं एकजीव करीत ती किंचित् हंसून म्हणाली.

" त्यांत रे काय एवढं लांबलचक विचारीत बसला आहेस, संतू?

कोथिंबीर लावायला का कोण नको म्हणणार आहे ? अन् त्यातून दुसरी झाडं मिळालींच वेळेवर तर आपली कोथिंबीर काढून घेऊं; त्यात काय मोठंसं ! दम धर अं, आज नवे धने आलेत ना त्यातले देते तुला.

लगबगीने कोठीच्या खोलींत शिरणाऱ्या त्या दोघाकडे मी हत-बुद्ध होऊन पहातच राहिलों. त्यानंतर दोनचार दिवस मी बागेत जाणे सोडूनच दिले. दिवसेंदिवस फोफावत चाललेला तो गवती चहा अन् तुरळक हिरवट होऊ लागलेले ते दोन कोथिंबिरीचे वाफे पाहिले कीं मला कसेसेच होई. सतू व माझी पत्नी मात्र दिवसेंदिवस वाढत्या उत्साहाने बागेचे निरीक्षण करीत. दोनचार दिवसानंतर एक दिवस मी हळूच बागेत डोकावले. एक मोठासा वाफा नुकतेंच कांहीं तरी पेरल्यासारखा दिसत होता. नशीबाची एकदा शेवटची परीक्षा पहावी म्हणून मी संतूला ताबडतोब हाक मारली. दोन वेळा मिळा-लेल्या विजयाने व माझ्या पत्नीच्या उत्तेजनाने चढून गेलेला सतूचा चेहरा पाहताच माझा चेहरा ताबडतोब उतरला. मेथीच्या भाजीचें वर्णन करतांना संतू अगदीं ऐन रंगांत आलेला पाहून कपाळाला हात लावून मी काढता पाय घेतला.

तेव्हांपासून संतूने माझा अगदीं सूड घेण्यास सुरवात केली. माझी बाग ॲग्रिकल्चरल कॉलेजच्या प्रयोगशाळेच्या दिवसेंदिवस तोंडात मारूं लागली. वांगीं, भेंड्या, दोडके, घोसाळी वगैरे भाज्या; गहूं, हरभरा, मटर, जोंधळा वगैरे धान्ये; कडूलिंब, कढिलिंब, पोपई,

डाळिंब वगैरे रोपांनीं माझी बाग रसरसलेली पाहून सतूला आनंदाचें भरतें येई; पण माझ्या मात्र पोटांत भडभडून येई. जेव्हा जेव्हा मी बागेकडे चोरटी नजर फेकी तेव्हां तेव्हां संतू बागेंत काहींतरी खटपट करीत असलेला माझ्या दृष्टीस पडे. केव्हां केव्हां तो अत्याचार मूग गिळून स्वस्थ पहात बसणें मला असह्य होई. असाच एक दिवस तो कांहीं खटपटींत असलेला पाहून मी धावत बागेंत गेलो. तो तो कांहीं सुकलेले कांदे, लसूण माझ्या लाडक्या मोगऱ्याच्या वाफ्यांत पुरून ठेवीत होता. संतूपुढे कांहीं बोलण्याची आतांशा माझी छातीच नव्हती. पण 'वड्याचे तेल वांग्यावर' या न्यायानें स्वयपाकघरांत जाऊन घरांत उधळमाधळ करण्याबद्दल मी माझ्या पत्नीची चांगलीच हजेरी घेतली अनपेक्षित झालेला हा कठोर वर्षाव पाहून बिचाऱ्या माझ्या पत्नीच्या डोळ्यांतील पाणी सबंध दिवस खळले नाही.

तेव्हांपासून माझ्या बसण्याच्या खोलींतून संतूच्या हालचालीवर माझें बारीक लक्ष माझ्या न कळत राहूं लागलें. संतू बागेकडे जाऊं लागला की माझे धाबे दणाणून जाई. एक दिवस सकाळीं हातात मोठासा टमाटा घेऊन बागेकडे जातांना मी संतूला पाहिलें. मला ब्रह्मांड आठवलें. खाड्कन् खुर्ची मागें ढकलून मी उठलो. घाईत माझें फाउंटनपेन टेबलावरून घरंगळून खालीं पडलें. पण तिकडे दुर्लक्ष करून मी आधीं संतूचा पाठलाग करूं लागलों. पण सत एव्हांना बागेंत पोचला होता व टमाटा जमिनीवर ठेवून माझ्या एका गुलाबाच्या वाफ्यांत त्यानें खणायलासुद्धा सुरुवात केली होती. गोड

बोलूनच आपला कावा साधेल असा मनाशी झटकन् विचार करून मी हंसून म्हटलें.

" काय रे संतू , काय चालली आहे तुझी खटपट आज—"

एखाद्या सरावलेल्या निष्णात तज्ञाने एखाद्या अप्रयोजक अन-भिज्ञाकडे पहावे त्याप्रमाणे तुच्छ नजरेने माझ्याकडे पहात संतू म्हणाला,

" आन् दुसरं काय–ह्यो टमाटा लावतुया नव्ह का !"

" कशाला लावतोस उगीच, संतू ?" मी आर्जवानें म्हणालो. " अरे, हे विलायती झाड. हे कसलं जीव धरतं आपल्याकडे. अन् शिवाय जागा तरी कुठाय रे आपल्याकडे–दे झालं टाकून." असे म्हणत म्हणत साळसूदपणे मी टमाटोला हात घातला. पण संतू खरो-खरच माझे बारशास जेवला होता. त्यानें भर्‌कन तो टमाटा उचलला.

" हा ? रावसाब, फेकता कशापांयी सोन्यासारखं फळ. त्यालाबी तुमास्नी दाम द्यायला लागला नव्ह जनुं."

मी चटकन् आगगाडीसारखा रूळ बदलला.

" असं हो संतू ? चांगला का आहे हा टमाटा ? मी म्हटलं कीं सडला बिडलाय वाटतं. मग चांगला रे टमाटा कशाला आणलास संतू. आण इकडे तो मी तुला दुसरा वाईटसा देतों एखादा."

असें म्हणत मी तो त्याच्या हातातून हिसकलाच व स्वयंपाकघरा-कडे धूम ठोकली. संतूहि हातांतली कुदळ टाकून देऊन—

" त्यो मला वहिनीआईनी दिला नव्हं का—अवो रावसाब, द्या

ो इकड. " करीत माझ्या पाठोपाठ आला.

मी स्वयंपाकघरांस तणतणतच शिरलो व एकदम गर्जायला सुरु-
ात केली.

" तुझी अक्कल दिवसेंदिवस अगदीं जात चालली बरं का ! का
ाझ्या ससाराचा सत्यानाश माडला आहेस असा ! काय ही उधळ-
ाधळ ? त्या दिवशी कादे—लसूण पाहिला तो असाच. आज टमाटोचा
ाच प्रकार. मी कोण महागाईचे टमाटे आदरून आणतो अन् तूं-"

माझी पत्नी पोळी लाटतां लाटता गुडघ्यावर डोळे टिपून सद्गदित
भावाजानें म्हणाली,

" कुठं काय वाया घालवलं मी—एकच उरला होता, अन् शिवाय
नगदीं जास्त झाला म्हणून —"

मी उतावीळपणानें म्हणालों,

" एकच उरला असला तर नुसताच पोराबाळांना खायला द्यावा.
यात बी व्हिटॅमिन् फार असतं म्हणे. पण तुम्हा अशिक्षित बायकांना
भक्कल कुठली एवढी ! आण बघूं थोडं मीठ, मीच खाऊन टाकतों
कसा तो — "

हात धुऊन डोळे पुशीत पुशीत माझ्या पत्नीने त्या टमाटोच्या
फोडी करून मिठाबरोबर मला बशींत घालून दिल्या. माझा हा
नारसिंह अवतार पाहून संतूने केव्हांच तेथून पळ काढला होता.
मला कच्चा टमाटो मुळींच आवडत नसे. आणि त्यांतून हा तर
अगदीं सडण्याच्या बेताला आला होता. त्या गिळगिळीत घाणेरड्या

फोडी गिळतांना होत असलेलीं माझीं वेडींवाकडीं तोंडें पाहून माझ्या पत्नीच्या तोंडावर बारीकशी हास्यछटा उमटली असावी, असा मला संशय आला. मग काय विचारतां, मी दुप्पट जोरानें तणतणूं लागलों.

" एवढींच एक बाब नाहीं. सगळीकडं तुझं दुर्लक्ष होत चाललंय आतांशा. हा संतू दिवसभर घरांत सगळीकडे फिरत असतो—बेटा आतांशा जरा हाताळ होत चाललाय बहुतकरून—पण तुझा आपला सगळा उघडा कारभार—"

" छे, भलतंच एखादं ! " चटकन् माझी पत्नी उद्गारली, " संतू नाहीं हो तसा मुळींच.—अन् शिवाय माझं सगळं कुलपांतच असतं कीं—गूळ, साखर, तूप, विरजणं—"

" हं, पुरे पुरे; वरती तोंड करून आणखी आपलं शहाणपण दाखवायला नको ! काय ग असतं तुझं कुलपांत ?—हें बघ मेथ्या, मोहरी. धने—सगळं उघड्यावरच पडलंय कीं " मी विजयोत्साहानें म्हणालों.

" इश्श ! " मनाला वाईट वाटलें असतांहि हंसें न आवरून माझी पत्नी म्हणाली, " या जिनसांना कशाला कुलूप अन् किल्ली ?"

" तुला अक्कल नाहीं म्हणतों ती इथंच. " मी अगदीं चिडून ओरडलों. " याच जिनसा आधीं कुलपांत ठेवल्या पाहिजेत. गूळ, साखर, तूप, बाहेर राहिलं तर कुछ फिकीर नहीं. त्यांचीं काय झाडं थोडींच लावतां येणार आहेत ? चल, टाक आधीं तें सगळं कपा-

टात. अन् सांगून ठेवतोंय्, उद्यांपासून धान्याचा एक कण बाहेर कुठं उघडा पडेल तर पहा ! पण तसं कशाला, मीच टाकतो सगळं कुलपांत अन् किल्ल्या माझ्या जानव्याला लावून ठेवतों. तसंच, वाण्याकडून मला विचारल्याशिवाय कांहीं आणलं तर खबरदार. अगदीं नमुना म्हणूनसुद्धां मला सांगितल्याशिवाय कांहीं घरांत येतां उपयोगी नाहीं. बायकांना फाजील स्वतंत्रता दिल्यानं माणूस कसा खड्यांत येतो हें चांगलंच समजलं आहे मला—"

इत्यादि बडबडत, दणदण पाय आपटीत मी चालता झालो. दुसऱ्या दिवशीं घरांत सगळीकडे कुलुपे पडलीं व किल्ल्या माझ्या ताब्यात आल्या. घरांत माझ्या परवानगीवांचून अगदीं पान हालेनासें झाले. पण त्यापासूनहि मला फार त्रास होऊं लागला. एवढ्या बदोबस्तांतूनहि संतू काही कारस्थान करील या भीतीनें त्याच्यावर टेहेळणी ठेवण्यात माझे रात्रंदिवस खर्च होऊं लागले. शिवाय अकल्पित रीतीनें बनलेल्या माझ्या संशयी स्वभावामुळें दीन झालेल्या माझ्या निरपराध पत्नीची दिवसभर खिन्न झालेली मुद्रा पाहून माझ्या हृदयाचें पाणीपाणी होई. पण मी तरी काय करूं ? एक संतू किंवा ही अवलक्षणी बाग—यांतून एकाची तरी वाट लागल्याशिवाय मला चैन पडणें शक्यच नाहीं. संतूला कामावरून काढून टाकण्याचा मला धीर होईलसें वाटत नाहीं. एक तर तो कोंकणांतून खास बाबांनीं विश्वासू म्हणून पाठवून दिलेला व इतके दिवस आमच्या घरांत रुळलेला. दुसरे, माझ्या मुलांना त्याचा

आतांशा भलताच लळा लागला होता. माझ्यावांचून दोनतीन दिवस तीं खुषीनें राहिलीं असतीं; पत संतू मात्र एक दिवस कुठें नजरेस पडला नाहीं तर तीं रडून आकान्त करीत असत. तिसरे म्हणजे, कामाधामाचा चलाखपणा, निर्मळपणा व सचोटी यांनीं तो माझ्या पत्नीच्या अगदी पसंतीस उतरला होता. तेव्हां संतू आमच्या घरांतून कधीं जाईल ही आशाच नको.

मुंबईला चाळींतून दोनतीन खोल्यांपलीकडे वीतभरहि मोकळी जागा मिळत नाहीं म्हणतात म्हणून आज महिनाभर बदलीसाठीं आमच्या साहेबांवर विनंतिअर्जांचा मी नुसता वर्षाव चालवला आहे. पण या चाडाळ साहेबांना आम्हां हिंदवासियांचीं अंतर्गत सुखदुःखे काय माहीत असणार ! पुण्यांतल्या पुण्यांत तरी निदान ज्याच्या मागेंपुढें टीचभरसुद्धां मोकळी जागा नाहीं असें घर शोधून काढण्या-साठीं मी सध्यां जोडेफाड चालवली आहे. कोणा दयाशील महा-त्म्यास अशी एखादी जागा माहीत असल्यास कृपा करून त्यानें मला जरूर कळवावे व एका दुःखी जीवाचें संकट निवारल्याचें श्रेय घ्यावे !

---

## बाहुल्या

"या छोटे साहेब, नानासाहेब, या...काय काय देऊ तुम्हांला. कळीची मोटार देऊं, कीं विजेचा छोटा पखा देऊं? कलकत्त्याहून आणलाय नुकताच तो." एका लहान मुलाच्या खेळण्याचा दुकानदार म्हणत होता. रावसाहेब दीक्षितांची मुलें हीं त्याचीं नेहमींचीं गिऱ्हाइकें होतीं. या मुलांची महिन्या दोन महिन्यांनीं एखादी तरी खेप इथल्या दुकानांत व्हायचीच. आणि नवीन तऱ्हेचीं भारी किंमतीची खेळणी खपावयाचीच. यामुळे साहजिकच ते दोन मुलगे दुकानांत शिरताच दुकानदार आनंदला व त्याच्या पुढे पुढे करून त्यांना नानातऱ्हेच्या मोहक वस्तु दाखवूं लागला. त्या मुलाच्या बरोबर आलेला म्हातारा गडी जरासा त्यांच्याभोवती घुटमळला; पण आपल्या छोट्या चंचल धन्याच्या खरेदीला तास-अर्धातास तरी नक्की लागणारच असा अदमास काढून त्यानें दुकानाच्या फळीवर बैठक मारली व खोकत खोकत आपली चंची सोडण्यास आरंभ केला.

त्या दोन मुलांबरोबर आणखीही एक मुलगी त्या दुकानांत शिरली होती. पण ती नवखी व या मुलांबरोबर पूर्वी कधीं आलेली नसल्यामुळें दुकानदाराचें तिच्याकडे लक्ष वेधले नाही. ते दोघे मुलगेही नवी नवीं खेळणी पाहण्यात गढून गेल्यामुळे आपल्याबरोबर आलेल्या आपल्या मावसबहिणीचें अस्तित्व विसरून गेले होते. आपल्याकडे

कुणीच लक्ष देत नाहीं हें पाहून ती अगदीं ओशाळल्यासारखी होऊन गेली होती. त्या दुकानाचा तो भव्य मनमोहक पसारा पाहून ती भारीच बावरून गेली होती व त्यामुळें तिच्या मूळच्या तरतरीत व गोड चेहऱ्यावर किंचित् बावळेपणाची छटा आली होती. आपले विस्तीर्ण काळेभोर डोळे सर्व दुकानभर ती भिरीभिरी फिरवीत होती. स्प्रिंगच्या मोटारी, ट्रामगाड्या, रबराचे चेंडू, छोट्या बॅट्स्, व रॅकेटस्, सेल्युलाईडचे पोपटाचे पिंजरे, लाकडी रंगीत चित्रें, खेळांतलीं घड्याळें, पंखे वगैरे नानातऱ्हेच्या खेळण्यावरून तिची नजर विस्मयानें व किंचित् भीतीनें सारखी फिरत होती. पाहता पाहतां दुकानाच्या उजव्या बाजूच्या कोपऱ्यांतील एका उंच कांचेच्या कपाटाकडे तिची नजर गेली. क्षणांत तिच्या नजरेंतला भीतियुक्त विस्मय व बावळेपणा नाहींसा झाला व तिचें डोळे शुद्ध आनंदाने हिरकण्यांसारखें लकाकले. बालसुलभ मोकळेपणाने तिने त्या कपाटाकडे धांव घेतली. नवीनच असलेल्या पायांतील कोऱ्या बुटानीं क्षणांपूर्वी तिला होत असलेला त्रास ती आता पार विसरून गेली. अंगांतले नाजुक व नवे कपडे सभाळण्यासाठीं थोड्या वेळापूर्वी तिच्या हालचालींत दिसणारा चोरटेपणा आतां अगदीं मावळून गेला. नेहमींच्या संवयीप्रमाणें चालूं लागल्यावर डोळ्यावर येणारे कैंस हातानें मागें सारण्याचा तिला अत्यंत शोभून दिसणारा भाव तिच्या नकळत हातून होऊन गेला. कांही क्षणापूर्वी असा भाव झाल्यावर आपले कैंस आज मोकळे नसून गुलाबी क्लिप्सनीं आपल्या मावशीनें खेंचून ठेवले

आहेत असें तिच्या ध्यानांत येऊन ती ओशाळी होई. पण आतां ती स्वतःला, निदान आपल्या नवीन स्वरूपाला, पूर्णपणें विसरली होती. चपलपणें त्या कपाटाजवळ जाऊन त्याच्या तावदानांवर तिनें आपले चिमुकले, व गोंडस हात टेंकले आणि आपलें कपाळ व नाक कांचेला अगदीं भिडवून आंतील नानातऱ्हेच्या बाहुल्यांकडे ती अगदीं टक लावून बेभानपणे पाहूं लागली. अहाहा! कितीतरी नानातऱ्हेच्या छानछान बाहुल्या होत्या तेथे. जिनगरी बाहुल्या, रबरी बाहुल्या, सिल्युलॉइडच्या गुलाबी व निळया गालांडोळयांच्या भपकेदार पोशाख केलेल्या बाहुल्या, कागदी लाबट डब्यांतून ठेवलेल्या भुरभुऱ्या केसाच्या डोळे मिचकावणाऱ्या मिस्किल बाहुल्या, व खऱ्या मुलां-एवढीं झबलेंगलोतें घातलेली कचकड्याची गोजिरवाणी बाळें यांनीं तें कपाट अगदी खच्चून भरून गेलें होते. त्या बाहुल्यांपैकीं आप-ल्याला कोणकोणच्या पाहिजेत हे ती हर्षभरित हृदयाने ठरवूं लागली. त्यातल्या उत्तम उत्तम बाहुल्या स्वतःसाठीं ठरवून ठेवल्यावर त्याच्या पेक्षां कनिष्ठ दर्जाच्या बाहुल्यांकडे ती लक्षपूर्वक पाहू लागली. कारण त्यांपैकीं दोन बाहुल्या आपल्या बहिणीसाठीं तिला घेऊन ठेवावयाच्या होत्या. हा विचार तिचें मनात येतांच आपल्या बहिणीची व आईची आठवण होऊन तिचें तोंड गोरेंमोरें झालें; पण आपण मावशीच्या घरीं राहायला जाणार म्हणून आपल्या आईला झालेले किंचित् खेद-युक्त समाधान व आपल्या बहिणींना वाटलेला हेवायुक्त विस्मय व आनंद आठवून तिच्या तोंडावर पुन्हा टवटवी आली. कारण आईला

प्रत्यक्ष सोडून जातांना जरी प्रभेला जरासें गहिंवरून आलें होतें, तरी एकदरीनें आपल्याला आपल्या श्रीमंत मावशीबरोबर पुण्याला जायला मिळणार म्हणून ती अगदीं हुरळून गेली होती. आपले कुरळे केंस मागें पुनः पुन्हा सारीत, आपल्या गोंडस हातानें गोडसे हावभाव करीत आपली मावशीच्या घरी आतां कशी चैन होईल याचीं भडक चित्रे तिने आपल्या बहिणींसमोर किती वेळां तरी काढलीं होतीं. पण त्या सर्वांत रसभरित वर्णन जर तिने कशाचें केलें असेल तर तें आपल्याला मिळणार असलेल्या नाना तऱ्हेच्या सुंदर सुंदर बाहुल्याचें. आपले काळेभोर डोळे विस्तीर्ण करून, आपली चिमुकली कल्पनाशक्ति शक्य तितकी ताणून तिनें आपण कधींकाळीं पाहिलेल्या व न पाहिलेल्या अशा मनमोहक बाहुल्यांची प्रणालि आपल्या बहिणी-समोर चटकदार शब्दात नाचविली होती व तिच्या बहिणींनीं ती आपल्या जिवाचा कान करून, किंचित् खेदानें, हेव्यानें सुस्कारे टाकीत आपल्या श्रवणसंपुटांत सांठवून ठेवली होती. बापावेगळ्या, चुलत्याच्या कृपण जीवावर वाढत असलेल्या त्या मुली ! त्यांना नाना तऱ्हेची तालेवारी खेळणीं कोठलीं ? पण प्रभेचें चिमुकलें हृदय आनंदानें उचंबळून त्या वेळीं विशाल बनलें होतें. व त्यामुळें उदार-पणें आपल्या बहिणीसाठींही एक दोन बाहुल्या घेऊन ठेवण्याचें तिनें त्याना कबूल केलें होतें.

या सर्व विचारांच्या व बाहुल्यांच्या नादांत तिची अगदीं तंद्री लागून गेली होती. तोंच "प्रभा, प्रभे, अरे ही प्रभी कोठें गेली ?"

असें तिच्या नानानें तिला म्हटलेलें तिला ऐकूं आलें. मोठ्या नाखुशीनें बाहुल्यांवरील नजर अर्धवट दूर करून तिनें लाडिक आवाजांत ओ दिली व जगू, नानारे, ही मी इथं आहें बघ रे. मला किनई...” असे गोड हेल काढून ती पुन्हां कपाटाकडे वळली; पण नानानें ताबडतोब येऊन तिचा हात पकडला.

“ इकडे काय ग बसली आहेस कोंपऱ्यांत येऊन. चल तिकडे. तुला नको कां कांहीं खेळ. हा बघ मी आपल्याला टेनिसचा चेंडू अन् रॅकेट घेतली आहे आणि जनूनं विजेचा किल्लीचा पंखा घेतला आहे. तुला काय पाहिजे, बोल ?” असें बोलत बोलत नानाने तिला जगू दुकानाच्या मध्यभागीं होता तिकडे नेले. प्रभेच्या चेहऱ्यावरचा उल्हास किंचित् मावळला होता, पण धैर्य धरून ती म्हणाली, “ नाना, मला किनई त्या कपाटांतल्या बाहुल्या— ”

“ काय, बाहुल्या ? ” नाना खो खो हंसत म्हणाला. “ अहाहा, तूं काय कुकुबाळ आहेस वाटतें, बाहुल्यांनीं खेळायला ? हा जगू बघ तुझ्याएवढाच आहे. तो कधीं खेळतो काय बाहुल्यांनी ? पण खरंच ! तं बायको आहेस नाहीं का ? आम्ही पुरुष नाहीं बाहुल्यांनीं खेळत. घे जा बाहुल्या. अहो, शेठजी, हिला बाहुल्या द्या बाहुल्या.”

या वर्षावाखालीं प्रभा अगदीं थिजून गेली. शेवटीं आपण बायको म्हणून नानानें चिडविलेलें पाहून तर तिच्या नाकाचा शेंडा लाल झाला व डोळे ओलावलें. “ मला नको जा बाहुल्या ” असें ती चिडून, कांहींशा रागानें, अभिमानानें म्हणणार तोच नाना कसलीशं

एकदम आठवण झाल्यासारखा पुन्हां बोलूं लागला.

" अरे हो, खरंच विसरलोंच कीं ! आईनं सांगितलं होतं की, प्रभीला कांहीं मेकॅनो, चित्रांचें ठोकळे, अक्षरांचे तक्ते, असं कांही आण म्हणून ! आहे का हो शेठजी तुमच्याकडे यांतले कांही ? प्रभाबाई, विसरा आतां बाहुल्या. आई म्हणाली, ' प्रभीला आधीं लिहायवाचायला शिकविलं पाहिजे. पुष्कळ झालं इतके दिवस खेळली ते '. नाही का ग प्रभे, तुझं शिकणं कितीतरी बुडल. आमचा जगू बघ. तो दुसरं तिसर वाटेल ते पुस्तक वाचतो. तुला शिकायचं ना जगूसारख ? "

नानूचा ता वडीलपणाचा डौल, कांहीं दबकावणीन व कांहीं आर्जवाने बोलण्याची ढब पाहून दुकानदाराला मोठे कौतुक वाटलें आणि ' हो, आहेत तर काय झालं आमच्याकडे हे सगळे जिन्नस ' असें म्हणत प्रभेच्या मालवलेल्या बावळया चेहऱ्याकडे पहात व नाना जगूची व तिची मनात तुलना करीत उठून आंत गेला. बिचाऱ्या प्रभेचे तोंड खरोखरच अगदीं चिमणीएवढें झालें होतें. आपली अश्रूंनीं डबडबलेली नजर बाहुल्यांकडे मधून मधून टाकीत दुकानदारानें आणलेल्या वस्तूंकडे ती एकाद्या निर्जीव चित्राप्रमाणें पाहूं लागली. तो दुकानदार चित्राकडे पाहून ठोकळ्याचा बंगला कसा बांधावा, " तिला समजावून सांगण्याचा प्रयत्न करीत होता; पण तिच्या तोंडावरचें शैथिल्य पाहून त्याला फारसे सांगावेंसेंच वाटेना. नानानेंच त्यांतल्या एकदोन जिनसा पसंत केल्या व दुकानदारानें

एकत्र बांधून दिलेलें सर्व सामान गड्याच्या हवाली करून तीं तिघें दुकानाबाहेर पडलीं.

* * * *

एकादा पोपट रानातून धरून आणून पिंजऱ्यात कोंडला म्हणजे प्रथम प्रथम पंख फडफडवून तळमळतो व समोरच्या पितळी पेल्यातील डाळिंबाचे दाणे व डाळ यांचा आस्वाद घेतांनासुद्धां रामफळेंच त्याच्यासमोर दिसूं लागून त्याचे मन त्या मिष्ट भक्ष्यावरून उडतें; पण कांहीं काळ लोटल्यावर त्याचे पंख निष्क्रिय होतात, रानफळाची चव विसरून डाळ तो कांहींशा आवडीनें खातो व नळाखालीं पिंजरा ठेवला म्हणजे त्या कृत्रिम तळ्यात प्रेमाने डुंबतो. पण तरीसुद्धां त्याच्या तोंडावर तो रानात असतांना दिसणारी स्वतंत्रतेची व तुष्टतेची तरतरी दिसत नाहींच. त्याचप्रमाणें प्रभा आपल्या नवीन व्यवसायांत गढून गेली. चित्रावरून ठोकळ्यांचे बंगले ती आतां बिनचूक बांधूं लागली. चित्राच्या तक्त्याशिवाय वाचूं लागली व जगू नानाबरोबर कुशलतेनें बॅट चेंडू खेळूं लागली. तिला आतां नवे कोरे बूट घालून सफाईनें चालतां येऊं लागलें, नाजूक किंमतवान् कपडे सुंदर राखतां येऊं लागले, स्वतःचें केंस क्लिप्सनीं रेखीव बसवितां येऊं लागले; पण अजूनही तिच्या एकंदर वागण्यांत जिवंतपणा किंवा समरस वृत्ति आली नव्हती, व त्यामुळें घरच्या व बाहेरच्या मंडळींवर तिची जशी छाप बसावी तशी बसली नव्हती. तिच्या आयुष्यांत कांहींतरी कमी आहे. तिच्या हृदयांतला एक कोपरा रिकामा पडला

आहे असें तिच्या कावऱ्याबावऱ्या वृत्तीवरून वाटे. ती बाहेरून निरुत्साही व रुक्ष दिसे; पण तिच्या हृदयांत एक प्रकारची विलक्षण उत्कंठित वृत्ति अर्धलुप्त होती. बाहुल्यांच्या दुकानांत ही उत्कंठित वृत्ति उसळी मारून बाहेर पडली होती; पण तिचा प्रतिकार केला गेल्यामुळें ती पुन्हां दबून गेली. त्यानंतर तिची ती वृत्ति कधी कधीं जागृत होई; पण ती फारच अपूर्ण स्वरूपांत असे. शेजारच्या मुलींच्या बाहुल्या, मावशीच्या मैत्रिणींचीं लहान तान्हीं मुले, लहान लहान कुत्र्यामांजरांची पिलें ही पाहून तिची वृत्ति उत्कंठित होई, पण ती फारच थोडा वेळ. वात्सल्याला ज्याची अत्यंत जरूर ते पूर्णस्वामित्व या वस्तूंवर नसल्यामुळें साहजिकच तिची उत्कंठा लवकरच मावळून जाई. पण लवकरच तिची उत्कंठित वृत्ति तीव्रपणें जागृत करणारी एक गोष्ट घडून आली. ती म्हणजे तिच्या मावशीला एक छोटेसें बाळ झालें.

दुपट्यांत गुरगुटून ठेवलेला तो कोवळा असहाय जीव पाहून प्रभा अगदीं वेडावून गेली. आपलें हरपलें श्रेय सापडलेंसें तिला वाटलें. दहा दिवस मावशीच्या खोलींत तिनें अगदीं जागता पहारा ठेवला होता. मावशी अंग धुऊन केव्हां घरात येईल आणि आपला ठेवा आपण आपल्या हस्तगत केव्हां करून घेऊं असें तिला झालें होतें. पण मावशी अंग धुऊन घरांत आली आणि प्रभेचा उत्साह हळुहळू मावळूं लागला. एक तर प्रभा फार लहान म्हणून मावशी इतक्या तान्ह्या मुलाला तिच्यापाशीं देत नसे; व दुसरें, आपल्यापेक्षा जगूनाना छोट्या बाळाला जास्त हक्कानें घेऊन बसूं शकतात हें पाहू।

तिचा बाळाकडचा ओढा हळुहळू कमी होऊं लागला. बाळ हळुहळू मोठा झाला तसतसा मावशी प्रभेपाशीं त्याला देऊं लागली; पण पहिला उमाळा दबला गेल्यामुळें बाळाला संभाळणें हें कामही ती आपल्या नेहमींच्या दक्ष, पण निरुत्साहि वृत्तीनें करूं लागली. तिची ही वृत्ति पाहून मावशी 'प्रभेला काहीं लहान मुलाची एवढी आवड नाहीं; जगूनानाला फार' असें म्हणे आणि स्वतःच्या हृदयाची ओळख न पटलेल्या प्रभेला ते खरे वाटूं लागले. एखादे वेळेस जास्त उठवळपणे प्रभा बाळाला खेळवीत असली म्हणजे मावशी चेष्टेने म्हणे, "भावंडांचा एवढा कंटाळा करतेस मग उद्यां स्वतःला मुलें झाली म्हणजे काय करशील ग?" त्यावर अजाण प्रभा चटकन् मानेला हिसडा देऊन म्हणे "इश्श! मला मुळीं मुलें नकोतच". वरकरणीं असे उद्गार तिच्या तोंडून बाहेर पडत; पण मावशीच्या या बोलण्याने एक अननुभूत भावना तिच्या हृदयात उत्पन्न होऊन तिला थरारवून सोडी. "स्वतःचीं मुले! स्वतःच्या मुलांवर दुसरा कोणी हक्क चालवणार नाहीं, नाहीं बरं! स्वतःच्या मुलाना हृदयाशीं घट्ट घट्ट आवळून दिवसभर त्याचे मटामटा मुके घेण्यास कोणाचीही भीति नाहीं, नाहीं का?" पण या अशा भावनांचें पृथक्करण करून त्यांचें मर्म ओळखण्याइतकी प्रभा मोठी नव्हती.

* * * *

फार दिवस दबून राहिलेली, जवळ जवळ मृतप्राय झालेली, प्रभेची उत्कंठित वृत्ति अत्यंत तीव्रतेनें व कायम स्वरूपात जागृत

करणारी एक गोष्ट आज घडून आली होती. 'अनंताला प्रभा द्यायची ठरलें. तिच्या आईची परवानगी आहे. जवळचाच मुहूर्त धरायचा.' असे तिची मावशी आपल्या एका शेजारणीजवळ सांगत असताना तिनें आडून ऐकलें. या बातमीने प्रभा एकदम अतोनात उल्हसली; पण या उल्हसित वृत्तीचे कारण कोणी तिला विचारले असते तर ती खात्रीनें घुटमळली असती. अनत तिला आवडत असे; पण अनंताशीं न ठरतां दुसऱ्या कोणाशीं जरी तिचें लग्न ठरले असते तरीही तिला हाच आनद झाला असता. नजरचुकीने घरटें अतरले म्हणजे पक्षी जसा आकाशांत भिरभिरी घिरट्या घालतो; पण शेवटी एकदाचे ते नजरेस पडलें म्हणजे आनंदानें चीत्कारून, पंख फडफडावून क्षणभर स्तिमित होतो व नंतर लागलीच मनोजवानें खाली उतरूं लागतो, त्याप्रमाणें प्रभेच्या मनाची स्थिति झाली होती. जगनाना व मावशी थट्टा करतील म्हणून मोठ्या प्रयासानें ती आपला आनंद झांकून ठेवीत असे.

अनंत हा प्रभेच्या मावशीचा मावसदीर. हा इतके दिवस मुंबईस डॉक्टरीचा अभ्यास करीत असे.परीक्षा पास झाल्यावर पुण्यास प्रॅक्टिस करण्याच्या उद्देशानें तो येऊन राहिला. त्याला त्याचें असें कोणीच नसल्यामुळे त्याचे लग्नकार्य होऊन बिऱ्हाडाचा जम बसेपर्यंत मावशींनी त्याला आपल्या घरींच राहवून घेतलें होतें. बाकी अनंत आपल्याला लग्न करावयाचें नाहीं असा कित्येक दिवस हट्ट धरून बसला होता. तो मोठा ध्येयवादी, तडफदार व कर्तबगार होता; पण त्याचा ध्येयवाद

अजून अनुभवाच्या कसोटीस उतरावयाचा होता. घरचा अत्यंत सुखी असल्यामुळें आपलें आयुष्य व विद्या समाजसेवेंत खर्च करण्याचा त्यानें संकल्प केला होता. त्या संकल्पास अनुसरून त्यानें पुण्यास एक धर्मार्थ इस्पितळही काढलें असून त्यांत अनाथ अपंगाना तो आश्रय देत असे. आपल्या समाजसेवेंत स्वतःच्या संसाराचा व्यत्यय येऊं नये म्हणून तो लग्न करण्याचे नाकारीत असे; पण मावशीच्या आग्रहानें म्हणा किंवा सहा महिन्यांच्या सहवासानें प्रभा त्याला आवडूं लागली होती म्हणून म्हणा, तो तिच्याशीं लग्न करावयास तयार झाला होता.

सकाळपासून लज्जेनें प्रभा अनंतासमोर जाण्याचे टाळीत होती. पण आज संध्याकाळीं अनंताचें हॉस्पिटल पाहण्यास सगळया मुलांनी जाण्याचे आधींच ठरले असल्यामुळें तें तिला टाळणे शक्यच नव्हतें. ठरल्या वेळीं जगूनाना, बाळ व प्रभा अनंताबरोबर बाहेर पडलीं. थोडा वेळ तीं सर्व बरोबर चालत होतीं; पण नंतर " आम्हांला ठाऊक आहे काकांचे इस्पितळ आम्ही आधीं जाणार " असें म्हणत ती केव्हांच पुढे निसटली. अनंतालाही हा एकांत नकोसा होता असें नाहीं. इकडचे तिकडचें बोलत बोलत चालत असतांना अनंताला मध्येंच एक कल्पना सुचली व तो गति मंदाऊन उल्हासानें म्हणाला, " मला वाटतं माझ्या पेशंटस्‌ना आनंद वाटेल असं कांहीं आपण त्यांना भेट म्हणून घेऊन जावं. तुला कस वाटतं प्रभा ?"

" हो, खरंच गडे नेऊं या. " उल्हासाने प्रभा म्हणाली. " फुलं

घ्यावीं मला वाटतं पुष्कळशी आणि तिथं लहान लहान मुलं आहेत ?"

तिच्या स्वरांतील उत्कंठा पाहून अनंताला जरासे आश्चर्य वाटलें. पण तिकडे दुर्लक्ष करून तो म्हणाला, "हो, आहेत तर काय झालें ! मुलेंच आहेत जास्ती प्रमाणात."

"मग, चला तर. ते पहा, त्या रस्त्याला खेळण्यांचं दुकान आहे. आपण छान छान एकदोन खेळणीं घेऊं."

अनत व प्रभा दीक्षितांच्या नेहमींच्या दुकानाच्या रस्त्याला वळली. चालतां चालतां किंचित हंसून अनंताने प्रश्न केला, "काय काय खेळणीं घ्यायचा बेत आहे आपला ?"

"तेथल्या लहान लहान मुलींसाठी आपण सुंदर सुदर बाहुल्या घेऊ या." प्रभा म्हणाली व त्या आठ नऊ वर्षांच्या पूर्वीच्या बाहुल्यांच्या कपाटाचें स्मरण होऊन तिचे डोळे आनंदाने चमकूं लागले.

"बाहुल्या ?" बेफिकीरीने तिच्या आत्यंतिक उत्साहाकडे पुरेसें लक्ष न जाऊन अनंत म्हणाला, छट, बाहुल्या नकोत. दुसरें कांही तरी छानसें घेऊं या."

ते अनपेक्षित शब्द ऐकून प्रभेचा चेहरा उतरला.

"कां नकोत बाहुल्या ?" तिनें किंचित् जोरानें, पण ओढलेल्या आवाजांत प्रश्न केला.

त्या आवाजातील भावनांची उत्कटता अनंताच्या कांहीशीं लक्षांत आली. आपल्या भावी पत्नीला व शिष्यिणीला आपली मतें समजा-

ऊन सांगण्याचा मोह त्याला आवरेना.

"हें बघ प्रभा, लहान लहान मुलींनीं बाहुल्यांनीं खेळण्याच्या मी अगदी विरुद्ध आहे. लहान मुली बाहुल्यांनीं कसले खेळ खेळतात. हें तूं पाहिलें आहेस कधीं ? बाहुल्यांची लग्ने लावणे, बाहुल्यांना आपलीं मुलें कल्पून त्यांना न्हाऊंमाखूं घालणें, भरवणे, निजविणें असे खेळ मुली खेळत असतात. पण असल्या खेळांनी त्यांच्या कोंवळ्या मनावर नको असलेले संस्कार उमटतात. नवरा–बायको, आई–मूल असल्या नात्यांची कल्पना व असल्या नात्यांविषयीं विचार या अल्लड वयांतच त्यांच्या मनांत खेळूं लागतात व अशा विकृत विचारांची मुलेंमुलीं एकत्र झालीं कीं फार अनिष्ट प्रकार घडून येण्याचा संभव असतो."

आपल्या नावीन्यपूर्ण विचारसरणींत अनंत कांही वेळ गुगून गेला. नंतर एकदम जागृत झाल्यासारखा तिच्याकडे वळून म्हणाला,

"तूं बाहुल्यांनीं कधी लहानपणीं खेळली आहेस का प्रभा ? नसशील– खात्रीनें नसशील. नाहीं तर तुझी आहे अशी वृत्ति राहिलीच नसती. बाहुल्यांनी खेळणाऱ्या मुली अकाली मातृपदाला हपापलेल्या असतात; पण तुझ्या हृदयांत ही वृत्ति अजून जागृत झाली नाहीं, असें मावशीच्या एकंदर सांगण्यावरून दिसते."

प्रभेला एकदम कसेंसेच झालें. तिचा चेहरा एकदम लालच लाल होऊन गेला, पण दुसऱ्याच क्षणीं तो अगदीं पांढरा फिकट पडला.

पण असले चेहऱ्यावरील बारीक फरक लक्षांत घेण्यासारखी अनं-

ताची मनोवृत्ति आतां नव्हती. दुरून मोहक दिसणाऱ्या ध्येयाच्या अभिनिवेशात तो अगदी गर्क होऊन गेला होता. तिच्या अवनत झालेल्या मुखाकडे ओझरती नजर टाकून तो म्हणाला. " प्रभा, लाजूं नकोस. ही तुझी वृत्ति मला सर्वस्वी इष्ट अशीच आहे. किंबहुना ही तुझी वृत्ति पाहूनच मी तुझ्याशीं लग्न करण्याचे कबूल केलें म्हणेनास ! संसाराची बेडी पायांत पडून माझ्या समाजसेवेची हानि होणार असें मला वाटले असतें तर मी लग्नच केले नसतें. पण प्रभा, तुझ्या निस्पृह व कर्तव्यकठोर वृत्तीमुळें तूं माझी उत्तम मदतनीस होशील. स्वतःच्या दोनचार मुलांची जोपासना करीत आपला आकुंचित संसार सांवरण्यापेक्षां हजारों गरीब अनाथ मुलांची माता होऊन समाजाचा संसार तूं उत्कृष्ट संभाळशील. तुझ्या इंग्रजी चारपांच इयत्ता झाल्याच आहेत. नर्सिंग–मिड्वाइफरीसारखा एकादा कोर्स तुझ्याकडून करवून घेतला म्हणजे समाजसेवेचें एक उत्कृष्ट साधन तुझ्या हाती दिल्यासारखें होईल. अरे, पण बोलतां बोलतां आलें कीं दुकान ! ये आंत प्रभा. "

पुष्कळ बोलण्याने अंगांत तरतरी आलेला अनंत चट्दिशीं दुकानांत चढून गेला व दुकानदाराशीं कांहीं चौकशी करूं लागला. निर्जीव, निष्प्रभ प्रभा एकाद्या कळीच्या बाहुलीसारखी पायऱ्या चढून वर आली.

अनंत विचारीत होता. " काय हो, तुमच्याकडे मेकॅनो, चित्रांचें ठोकळे, अक्षरांचे तक्ते असें कांहीं सामान आहे कां ? "

" हो, आहे तर ! " या ओळखीच्या गिऱ्हाइकांकडे आदरानें व कौतुकानें पहात दुकानदार उठला व आंतून त्यांना हव्या होत्या तशा जिनसा आणून त्या दाखवूं लागला. बाहुल्यांकडे लागलेली अश्रुपूर्ण नजर कष्टानें प्रभेनें त्या रंगीबेरंगी ठोकळ्याकडे वळवली. दुकानदार चित्रावरून ठोकळ्यांचा बंगला करण्यास मुलाना कसें शिकवावें तें समजावून सांगत होता; पण प्रभेचे चित्त त्याच्याकडे लागेना. पुनः पुन्हा बाहुल्यांकडे तिची नजर वळत होती. आपल्या हृदयांत कांहींतरी कांचल्यासारखे होऊन हळुहळू तुटत आहे असा तिला भास होत होता. तिनें आपल्या हृदयावर हात ठेवून एक लांब जड नि:श्वास सोडला व त्या ठोकळ्याकडे आपली निर्जीव दृष्टि वळविली. त्या निःश्वासाबरोबर इतके दिवस वरचेवर जागृत होणारी प्रभेच्या हृदयांतील उत्कंठित वृत्ति जणुं काय तिला सोडून कायमची वातावरणात विलीन झाली !



## मृगजल

कीन्स रोड ओलांडून पलीकडे जायचें म्हणजे एक मोठें संकटच असे रोज चौपाटीवर फिरावयास जातांना मला वाटे. पांच मिनिटें स्वस्थपणें रस्त्याच्या कडेस उभ राहून डावीकडे लांबवर नजर टाकून एकही मोटार येण्याचा संभव नाहीं अशी पूर्ण खात्री करून घेतल्यावर मी रस्ता ओलांडण्याचा निश्चय करीं व श्वास वरचेवर धरून जवळजवळ धांवतच रस्ता ओलांडून जाई. या माझ्या बालिश व खेडवळ भित्रेपणाचे माझें मला एखादें वेळेस फार हंसूं येई; पण या जाणिवेनें रस्ता ओलांडतांना धडधडणाऱ्या छातीचा मात्र जोर कमी होत नसे. त्या दिवशीं मात्र एक धांव मारून रस्त्याची दुसरी कड गाठणारा मी रस्त्याच्या मध्यभागीं स्तिमित होऊन उभा राहिलों. पलीकडच्या फूटपाथवरून हळुहळू जाणाऱ्या एका व्यक्तीकडे आश्चर्य, आनंद व खेदसंमिश्रित दृष्टीनें अनिमिष मी पहात राहिलों, व क्षणभर भोवतालचें वातावरण व नेहमीची अपघाताची भीति विसरून गेलों. माझ्या अगदीं जवळ येऊन टेपलेल्या एका मोटारीचा कर्कश व घाबरट पों पों असा आवाज ऐकून मी भानावर आलों व लगबगीने समोरचा फूटपाथ गांठला. ज्या व्यक्तीला पाहून मी इतका गोंधळून गेलों होतों ती व्यक्ति माझ्यापासून कांहीं फार दूर नव्हती. माझ्या स्मरणशक्तीला

पुनःपुन्हा ताण देऊन ती चांगली ताठ पीळदार होईपर्यंत मी त्या गृहस्थाच्या बाजूबाजूनें चालत होतों. शेवटी जवळजवळ मनाची खात्री होऊन मी त्या गृहस्थाच्या अगदीं जवळ गेलो व त्याच्या स्कंधाला स्पर्श करून किंचित् चांचरतच म्हटले, "कोण माफ करा; पण आपण सदानंद तर नव्हे?"

सदानंदाने—हो तो सदानंदच होता—किंचित् चमकून माझ्याकडे वळन बघितले. क्षणभर तो गोंधळल्यासारखा दिसला; पण लगेच त्याच्या मदावलेल्या निस्तेज डोळ्यात ओळख पटल्याची लकेर चमकली. "विजय" मद स्वराने तो म्हणाला, "विजय, किती दिवसानी भेटलास हा?" सदानदाने माझा हात आपल्या दोन्ही हातांत धरून प्रेमाने दाबला. सदानदाचा तो निर्जीव अस्थिपजर हात, तो फुटलेला रुक्ष आवाज, तो निस्तेज चेहरा पाहून माझ्या अंतःकरणाला तीव्र वेदना होऊं लागल्या. पण माझ्या मनोवृत्ती व माझी जिज्ञासा एकदम अनावर होऊं देणें इष्ट नव्हते. फारा दिवसानीं भेटलेला सदानंद माझ्या जिज्ञासेने भिचकून एकदम नाहींसा कशावरून नाहीं होणार! आस्ते आस्ते त्याच्या कलाने घेऊन त्याची सर्व हकीकत काढून घ्यावी अशा विचारानें मी म्हटलें.

"चला, सदानंद, कुठेंतरी निवांतपणें बसूं या. कितीतरी हकीकती एकमेकांना सांगावयाच्या असतील आपल्याला. माझ्या खोलीवर चलतां, का बसूं या चौपाटीवरच!"

"चल चौपाटीवरच" सदानंद म्हणाला. हकीकतींच्या उल्लेखा-

बरोबर त्याच्या शून्य चेहऱ्यावर विकारलहरी उसळल्याचा मला भास झाला.

आम्ही दोघे चौपाटीकडे निघालों. वाटेने मी कांहींच बोललों नाहीं. आपण होऊन आपल्या कुतूहलाला बेलगामी सोडावयाचें नाहीं असा मी श्रमपूर्वक मनांत निश्चय केला होता. सदानंदही काहीं बोलला नाहीं. चौपाटीवर गेल्यावर वाळवंटात उतरून शक्य तितका एकीकडचा असा एक कोपरा मी शोधून काढला व आम्ही दोघें तेथें जाऊन बसलों. सदानद एखाद्या निर्जीव बाहुल्याप्रमाणे माझ्या शेजारी येऊन बसला; पण त्याच्या मनांत मात्र अतिशय खळबळ चालू असल्याचे त्याच्या चेहऱ्यावरून दिसत होते. त्याला बरेच बोलावयाचें होतें; पण तें जुळवून कसे बोलावे याची त्याला अडचण पडल्याप्रमाणे त्याच्या चेहऱ्यावरून दिसत होते. मलाही संभाषणाला कशी सुरवात करावी तें समजेना. अशा अस्वस्थ मूक स्थितींत दहा मिनिटें गेली. शेवटीं सदानंद एक दीर्घ सुस्कारा टाकून म्हणाला, " विजय, किती किती दिवसांनी तुझी भेट होत आहे ही ! एकवीस सालीं आपण भेटलों होतों, नाहीं ? "

माझ्या डोळ्यापुढे सदानंदाच्या भेटीबरोबर एकवीस सालच्चीं स्मृतिचित्रें नाचतच होतीं. त्या वर्षी अत्यंत बहुमानपूर्वक सदानंद मुंबईच्या विश्वविद्यालयातील उच्चतम परीक्षा पास झाला होता. आमच्या कॉलेजमधील छात्रवर्ग व आचार्यवर्ग यांनीं या यशाबद्दल सभा भरवून सदानंदाचा जाहीर रीतीनें सन्मान केला होता. त्या

संस्मरणीय दिवशीं संध्याकाळीं आम्ही सर्व सदानंदाचे चहाते मित्र त्याच्या खोलींत गप्पासत्रासाठीं व चहा-चिवड्याचा फन्ना पाडण्यासाठीं एकत्र झालों होतों. तीच माझी व सदानदाची शेवटची दृष्टादृष्ट. त्या दिवशींचा सदानंद म्हणजे मूर्तिमंत उत्साह, उल्हास, महत्त्वाकांक्षा, आत्मविश्वासच होता. त्याची तेजस्वी अगकांति, पिळदार शरीरयष्टि, करारी पण किंचित् हंसरी मुद्रा, जणु कालच पाहिल्या प्रमाणें माझ्या लक्षात होती. त्या होतकरू, उदयाभिमुख तरुणाचा, हा आजचा निरुत्साह, अधःपाताच्या दरींत खोल रुतून गेलेला तरुण कसा झाला ? जीवनकलह बिकट खराच. पण सदानंदासारख्या पराक्रमी, गुणी तरुणालाही त्याने इतके पिळून काढावे ? अशा कोठल्या भयंकर परिस्थितीच्या चक्रात सदानंद सांपडला असावा बरें ? हें विचारभ्रमण माझ्या मस्तकात चालू असतां सदानद पुढें बोलूं लागला:—

" किती आनंदाचे दिवस होते ते नाहीं, विजय ? मी एम्. ए. झालों तेव्हां तूं इंटर–मीजिएट पास झालास. नाहीं का ? "

" हो, पास झाल्यावर तुम्ही विश्राति घेण्यासाठीं व पुढचे प्लॅन ठरविण्यासाठीं आजोळीं गेलांत. त्यानंतर काहींच समजलें नाहीं तुमच्याकडून ! "

" त्यानंतर कुणाला कांहीं लिहिण्याच्या मनःस्थितींत नव्हतोंच मी " सदानंद खिन्न स्वरानें म्हणाला. आतां त्याच्या आयुष्याचें कोडें उलगडणार म्हणून मी उत्कंठापूर्वक ऐकूं लागलों; पण कांहीं

वेळ सदानंद अगदीं स्तब्ध बसला. पूर्वीच्या आठवणीनें त्याचा चेहरा कांहींसा खिन्न व कांहींसा उत्कट दिसूं लागला. त्याच्या हृदयांत विचारांची विलक्षण खळबळ उडाल्यामुळें काहीं वेळ त्याला बोलवेना असें दिसले. नंतर त्यानें आपले सर्व हृदय पिळवटून, एक दीर्घ उसासा टाकला. त्या उसाशाने माझें अंतःकरण कळवळलें; पण सदानंदाच्या अंतःकरणावरचा भार बराच कमी झाल्यासारखा दिसला. त्याची मध्येंच खुंटलेली वाणी अस्खलित सुरू झाली:

"विजय, मामांच्या घरीं विश्रांति घेण्यासाठीं म्हणून मी गेलों खरा; पण विश्रांति अशी क्षणभरही मला लाधली नाहीं. 'पुढें काय?' हा प्रश्न मला रात्रंदिवस नानाप्रकारचीं भीषण रूपें घेऊन भेडसावीत होता. बाबांच्या कृपेने जन्मभर मला माझ्या पोटापाण्याबद्दल विवंचना करीत बसण्याचे कारण नव्हते खरें. पण विजय, इतका काळ, श्रम व पैसा खर्च करून मिळालेलें शिक्षण व संस्कृति सुखवस्तूपणाच्या निष्क्रिय जीवनांत नामशेष होऊन जावी ही कल्पना मला साहजिकच सहन होईना. त्या वेळच्या देशस्थितींत करण्याजोगें असें पुष्कळच आहे हें माझ्या बुद्धीला पटत होतें. पण त्यापैकीं कोठल्या विवक्षित क्षेत्रांत कार्यासाठीं उडी घालावी याचा मनाला निश्चय करतां येईना. मामांपाशीं, मामेभावांपाशीं, सुविद्य मामेबहिणींशीं, त्यांच्या बहुरंगी मित्रमंडळाशीं नाना विषयांवर मी नित्य खल करीत असें. विविध पुस्तकें वाचून माझ्या कर्तृत्वाची दिशा निश्चित करण्याचा मी कमालीचा प्रयत्न केला; पण व्यर्थ. त्यांपैकीं

एकही विषय माझ्या मनाला मिळेना, हृदयांत बिंबेना. शिक्षणक्रमांत तीव्र ठरलेली माझी बुद्धि आतां अगदीं बोथट, निरुपयोगी बनली होती. एकेक अमोल दिवस कवडीमोलानें वेंचला जात होता व मी किंकर्तव्यमूढ होऊन वेड्यासारखा तो नाश बघत होतों. हळुहळू उदासचित्त होऊन बाहेर लोकांत जाण्यायेण्याचें मी सोडून दिलें. घरांतल्या घरांतही हंसण्याखिदळण्यांत, गप्पागोष्टींत मी भाग घेईनासा झालो. मामांच्या घरी मला देण्यांत आलेल्या खोलीत दार लावून घेऊन एकाद्या पिसाटासारखा मी दिवस घालवूं लागलो. दुपारचें जेवण झाल्यापासून अगदीं संध्याकाळ होईपर्यंत मी खोलीत शून्य चित्तानें पडून रहात असें व नंतर जेवण करून एकाद्या पिशाच्चा-प्रमाणें मध्यरात्रीपर्यंत माळावर भटकत असें. माझ्या या अननुभूत उदासवाण्या एकलकोंड्या वृत्तीनें माझ्या भाऊबहिणी कधी अस्वस्थ होत, तर कधी आश्चर्य प्रकट करीत. मामी तर एखादे वेळेस ' मला ठाऊक आहे असं कां झाल आहे ते ! काढूं या लवकरच या एकल-कोंडेपणाच्या आवडीवर उपाय शोधून अं !' असा डोळे मिचकावून विनोद करीत. मीही कधी डोकें दुखत असल्याची, कधी बरेंच वाचन करावयाचें असल्याबद्दलची, अशी कांहींतरी सबब सांगून वेळ मारून नेत असे. माझ्या या चमत्कारिक वृत्तीबद्दल फार चिकित्सा होण्या-पूर्वीं येथून निघून जावें असाही बेत मी माझ्या मनाशीं वरचेवर करी; पण निष्क्रियतेमुळें निर्जीव व जड झालेल्या माझ्या मनाला व देहाला इतकें करणेंही ताबडतोब उरकेना.

अशा या अस्वस्थ वृत्तीने एका संध्याकाळीं माझ्या खोलींतील टेबलावर दोन्ही कोपरें टेकून विमनस्कपणे मी खुर्चीवर बसलों होतों. त्याचवेळीं माझ्या आयुष्यांत क्रांति घडवणारा तो प्रसंग घडन आला.

सदानंद एकदम थांबला. भरवेगानें अग्निरथ धांवत असतां एकदम थांबला म्हणजे प्रवाशांना जसा धक्का बसतो तसा धक्का एकदम मला बसल्यासारखे झालें. अनपेक्षित रीतीनें आगगाडी का उभी राहिली, म्हणून जिज्ञासेने प्रवासी जसे खिडकीतून बाहेर डोकावण्यासाठी धडपडत असतात, त्याप्रमाणे कुतूहलाने व अत्यंत उत्कंठेनें मी सदानंदाच्या तोंडाकडे व त्याच्या मनातील सर्व भाव विलक्षण रीतीनें प्रतिबिंबित करणाऱ्या त्याच्या डोळयांकडे पाहूं लागलें.

सदानंद पुढें बोलूं लागलाः—

" विजय, मला मामांच्या घरी मिळालेली खोली अत्यंत हवाशीर व पूर्वाभिमुख असून तिला पश्चिमेच्या व उत्तरेच्या बाजूंना प्रशस्त दोन-दोन खिडक्या होत्या. त्यामुळें मावळत्या सूर्याचा सोनेरी तजेला व नंतरचा धूसर संधिप्रकाश माझ्या खोलींत मोकळेपणानें वावरे. मी त्या दिवशीं जेव्हां टेबलावर कोंपरें टेंकून बसलों होतों, तेव्हां सूर्याचें बिंब क्षितिजावर टेकलेलें असावे. कारण मावळत्या सूर्याचे पिवळट नयनाल्हादक किरण खिडकीच्या व पडद्यांच्या कडांतून घुसून माझ्या समोरच्या भिंतीवर पडले होते. कुठेंच स्थिर नसलेली माझी शून्य नजर सहजगत्या वर उचलून त्या चोरट्या किरणांच्या दिशेनें मी समोरच्या भिंतीवर स्थिर केली. तोंच काय चमत्कार—"

सदानंदाने हे शेवटचे शब्द इतक्या उत्कटतेने उच्चारलें कीं, ते माझ्या कर्णपथावर आदळल्याबरोबर माझ्या सर्व शरीरांतून एक विद्युल्लहरी सरकन् चमकून गेली. माझ्या शेजारीं बसलेल्या निर्जीव सदानंदाच्या शरीरांत नवचैतन्यानें प्रवेश केला असावा, असे मला वाटलें. माझ्या समोरच्या सागरावरून नजर काढून ती मी सदानंदाच्या चेहऱ्याकडे वळवली. माझ्या समोरचा एका क्षणापूर्वीचा मातट रंगाचा व मिणमिणीत तेजाचा सागर, मावळत्या सूर्याच्या लाल किरणानी रंजित झाला होता. सदानदाच्या एका क्षणापूर्वी निर्विकार दिसणाऱ्या चेहऱ्यावर तेजाच्या, आनदाच्या, उत्कंठतेच्या लहरी उसळत होत्या. मी सागराकडे पुन्हां नजर वळवली व मनाचा कान करून ऐकत राहिलों.

" तों काय चमत्कार सांगू विजय ! माझ्या समोरच्या भिंतीवर पडद्याच्या वर्तुलाकार कडेंतून घुसलेल्या सूर्यकिरणानीं एक प्रकाशवर्तुल बनलें होतें आणि त्या तेजोवलयाच्या मध्यभागी त्या तेजानें उठून दिसणारें व त्या तेजाला जास्त शोभविणारे एक मुखकमल विलसत होते. त्या मोहक चेहऱ्यावरून माझी दृष्टि निघेचना. तें मुखकमल तेजस्वी असून एक प्रकारच्या मधुर भावानें सौम्य दिसत होते. त्या बालिकेचे डोळे तेजस्वी होते; पण त्याचे तेज संधिप्रकाशांतील तेजस्वी ताऱ्यांप्रमाणें नाजूक व गोड होतें. पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें विलसत असलेलें तें सुंदर मुख माझ्या हृदयसागराला उचंबळवून माझ्या शरिरांतील सुप्त उत्साह जागृत करीत होतें. त्या सुंदर मुख-

कमलावरील दिव्य तेजानें माझें मेलेलें हृदय खडबडून जागें झालें. पांच मिनिटांपूर्वी जगाच्या अगडबंब व कूटमय पसाऱ्याला कंटाळलेल्या मला, जगांतले सर्व व्यापार एका विशिष्ट तत्त्वावर अर्थपूर्ण रीतीनें केंद्रीभूत झाले आहेत, असा एकदम विश्वास वाटूं लागला. जगांतील तें गूढ तत्त्व, तो खोल अर्थ, त्या तेजस्वी बालिकेच्या डोळ्यांत सांपडेल अशा दृढ भावनेनें मी त्या उत्साहदायी दृश्याकडे पांच मिनिटे अनिमिष टक लावून बघत होतों. हळुहळू तें सुंदर मुखकमल दूरदूर जात असल्याचा मला भास होऊं लागला. ते स्वर्गीय दृश्य या नश्वर, विनाशी जगांत फार वेळ कसचे टिकते, या भावनेनें माझी उत्कट आनंद-समाधि ढळली व मी अस्वस्थचित्त झालों. समुद्राच्या लाटावरून मागें नाचत जात जात एकदम अदृश्य होणाऱ्या संध्येप्रमाणें संध्यासमयाच्या शुभमुहूर्तावर प्रकट झालेली ती माझी स्फूर्तिदेवता दूरदूर जाऊन एकदम नाहींशी होईल, या कटु व दुःखद कल्पनेने माझे हृदय पुन्हां खचलें. माझ्या डोळ्यांपुढें स्पष्ट कांहींच दिसेनासे झालें व माझे भ्रमण पावत असलेलें मस्तक हातांच्या वेटोळ्यांत टेबलावर मीं स्थिर केलें.

" मी असा किती वेळ बसलों होतों याचें मला स्मरण नाहीं. पण जेव्हां कातरमनानें मी मान वर केली, तेव्हां माझ्या खोलींत, माझ्या मनांतल्याप्रमाणेंच गाढ, अभेद्य अंधार पसरला होता. मी तसाच उठून बाहेर आलों. जेवते वेळेस माझी मनोवृत्ती फारच चमत्कारिक झाली होती. रात्रीं फार उकडत असल्याच्या सबबीवर मी

गच्चीवरच निजलो. कां कोण जाणे, पण त्या खोलींत जाण्याचा मला धीरच होईना. दुसऱ्या दिवशीं सकाळींच उठून मी फिरावयास गेलों. तो सगळा दिवस माझ्या खोलींत न जातां मी बाहेर बाहेरच काढला. पूर्वींसारखा त्या दिवशीं मी हसतां खिदळताना, गप्पा-गोष्टी करतांना पाहून माझ्या मामा मामींना कितीतरी बरें वाटलें. त्यांची प्रसन्न वृत्ति माझ्या वृत्तींतही प्रतिबिंबित झाली होती. संध्या-काळच्या एका विशिष्ट क्षणाची मात्र मी चातकाप्रमाणें प्रतीक्षा करीत होतो. सूर्यनारायणाचे आरक्त पदकमल पश्चिमेच्या उंबरठ्यावर पडलेले पाहून उत्कंठित पण कांपऱ्या पावलांनीं मी माझ्या खोलींत प्रवेश केला. टेबलाजवळच्या माझ्या खुर्चीवर मी खालच्या मानेनें जाऊन बसलो. एक दोन मिनिटें मी तसाच खाली डोळे लावून बसलो होतों. शेवटी मनाचा धडा करून मी मान वर उचलली व माझ्या समोरच्या भितीकडे नजर फेकली. ''

सदानंद किंचित् थाबला असेल किंवा नसेल; पण माझ्या परम-कोटीला पोंचलेल्या उत्कंठेला त्याच्या या व पुढल्या वाक्यांत प्रह-रांचें अंतर होतें असा भास झाला.

" आणि विजय, समोर नजर टाकतांच माझें शरीर रोमांचांनीं पुलकित झालें व डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. माझी भाग्यदेवता आदल्या दिवसाप्रमाणेंच आपल्या मधुर, तेजस्वी व स्फूर्तिदायक स्वरूपांत त्या दिव्य तेजोमंडळाच्या मध्यभागीं प्रकट झाली होती. माझ्या नसांनसांतून नवचैतन्य सळसळूं लागलें. जग म्हणजे एक

अगम्य असें कोडें नसून कर्तृत्ववान् वीरांच्या कर्तृत्वाला अवसर देण्यासाठीं तयार केलेलें एक विस्तृत, प्रमाणशीर क्रीडांगणच आहे, असें मला वाटूं लागलें. त्या माझ्या देवतेच्या नेतृत्वाखालीं या क्रीडागणांत विहार करण्यासाठीं माझें हृदय उतावळें झालें; पण आदल्या दिवसाप्रमाणेच तें मधुर दृश्य दूरदूर जात असल्याचा दुःखद अनुभव मला येऊं लागला. पुन्हा चोवीस तास आंधळ्या-प्रमाणें कष्टमय जगांत रखडण्याची कल्पना असह्य होऊन मी डोळे मिटून घेतले.

" दुसऱ्या दिवशी सध्याकाळी हाच दिव्य अनुभव मला आला. नेहमींप्रमाणे पांच-दहा मिनिटाच्या अवधींत माझी स्फूर्तिदेवता अंत-र्धान पावली. पण त्या दिवशी निराशेने हातपाय गाळून मी बसलों नाहीं. त्या बालिकेची ती दिव्य, मधुर मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर असतांनाच त्या दिव्यत्वाला साक्ष ठेवून त्या माझ्या देवतेला काय-मची आपली करण्याविषयीं प्रयत्न करण्याची मी प्रतिज्ञा केली. ती प्रतिज्ञा केल्याबरोबर माझें अंतरंग समाधानानें भरून गेले व माझ्या आयुष्याचें कोडें उलगडले."

" तुमच्या आयुष्याचे कोडे उलगडले ? तें कसें " मी गोंधळून उद्गारलों. सदानंदाच्या आयुष्याचा व त्या विलक्षण प्रतिज्ञेचा काय संबंध, तें माझ्या चटकन् लक्षांत येईना.

माझा हा प्रश्न सदानंदाला अपेक्षितच होता. माझा हात आपल्या हातांत घेऊन गंभीर पण कळकळीनें भरलेल्या स्वरानें तो बोलूं लागला—

" विजय, ते मी कसे समजावून सांगू तुला? सांगून तुला पटेल कीं नाहीं कोण जाणे! माझ्या आयुष्यांतील या चमत्कारिक घटनेबद्दल मी दुसऱ्या कोणापाशीं अवाक्षरही काढलेलें नाहीं. सहानुभूतीऐवजीं कुचेष्टेचें भरपूर माप मात्र जगाकडून पदरांत घेण्याचें माझ्यासारख्या लोकांच्या अदृष्टीं लिहिलेले असतें. पण आज तुला पाहिल्याबरोबर, कां कोण जाणे, विजय, माझे अंतःकरण उचंबळून आलें. केव्हांतरी, कुणापाशीं तरी हृदयावरचा भार हलका केलाच पाहिजे एकदां! तो तुझ्यापाशीं केल्यास सहानुभूति-निदान अनुकंपा तरी खास मिळेल असे मला वाटूं लागलें."

सदानंदाचा माझ्यावरील हा विश्वास पाहून कृतज्ञतेनें माझें हृदय भरून आलें. माझ्या दोन्ही हातांनीं त्याचा हात प्रेमाने व आदरानें मी दाबला. माझ्या सहानुभूतीविषयींचा विश्वास याप्रमाणे दृढ झालेला पाहून सदानंद उल्हासला व आपली कहाणी पुढें सांगू लागला—

" विजय, क्षणभर तेव्हां ज्या मनःस्थितींत मी होतों, त्याच स्थितींत तूं आहेस, अशी कल्पना कर; म्हणजे तेव्हां मी तसा कां वागलों, तें तुझ्या ध्यानांत येईल. तेव्हां दोन चार महिने 'पुढें काय?' असा जप करीत किंकर्तव्यमूढ होऊन मी बसलों होतो. एकाद्या निर्जन प्रदेशांत वाट चुकून एकाकी पडलेल्या वाटसराप्रमाणे मी दीनवाणा व भयभीत झालों होतों. दाही दिशांकडे तोंड फिरवून स्वर उंचावून मी निर्वाणीचा साद अनेकवार घातली होती. पण कोणीकडूनही मला धीराची हांक ऐकूं आली नाहीं. माझ्या भोंव-

तालचें जग दिवसेंदिवस जास्तच उदासवाणे व भयप्रद होत चाललें होतें; आणि नंतर एक दिवस एकाएकीं ती तेजोमूर्ति माझ्यासमोर प्रकट झाली. अशा वेळीं त्या तेजानें भुलून जाऊन त्या देवतेच्या शोधासाठीं मी जिवाचे रान करून घेण्याचा निश्चय केला. यात माझें काहीं चुकलें असें तुला वाटतें का विजय ?"

आशेनें माझ्याकडे पहात सदानंदानें प्रश्न केला. मी आधींच गोंधळून गेलो होतों. मी काय उत्तर देणार या प्रश्नाचे ? सदानंदाच्या आयुष्याचा काय शेवट होणार हे मला स्पष्टच दिसत होतें. पण त्यावरून ध्येयाचा मार्ग आखण्यात त्याचे कोठे चुकले हें मला कसें सागता येईल ? सदानंदाविषयी माझी फारच पूज्यबुद्धि होती. त्याच्या आशा आकाक्षा, त्याचे कार्यक्षेत्र माझ्याहून कितीतरी उच्च वातावरणांत असले पाहिजे अशी माझी भावना होती. तेव्हा त्याच्या ध्येयाच्या बऱ्यावाईटपणाबद्दल मत देण्याचा मला काय अधिकार ? सदानंदाचे आयुष्य व्यर्थ झालें असेल; पण खात्रीने काहींतरी उच्च ध्येयाच्या पाठलागातच तें वेचले गेलें असेल. पार्थिव जगाशीं जखडून घेऊन धिम्मेपणाने मळलेली वाट आक्रमण्यांत काय एवढा पुरुषार्थ आहे ? त्याच्यापेक्षा दिव्य वस्तूंमागें लागून जिवाची राळ करून घेणेंच जास्त श्रेष्ठ असले पाहिजे.

"सदानंद" मी म्हणालों, "काय विचारता आपण मला हें ! आपण जो मार्ग आक्रमिला, त्यानें आपला जरी अधःपात झाल्यासारखा दिसला तरी त्यांत आपली दिशाभूल झाली असें मला कसें

बरें म्हणतां येईल ! विश्वचक्राच्या दैनंदिन क्रमांतील कोणत्या चुकी-मुळें दोन प्रबळ ग्रह एकमेकावर आपटून त्यांचीं शकलें उडालीं, हें पृथ्वीवरील एका लहानशा मशकाला कसें सांगतां येणार ! "

माझ्या या उत्तरानें सदानंदाच्या चेहऱ्यावर एक बारीकशी स्मिताची लकेर झळकून गेली. पण लगेच त्यानें अंगावर कांहीं आठ-वणीनें शहारा आल्यासारखे केलें व त्याच्या चेहऱ्यावर उदासीनतेची काळी छाया पसरली.

" पण, सदानंद " पुढची हकीकत जाणण्याची उत्कंठा अनावर होऊन मीं म्हटलें, " आपल्या आयुष्याचें कोडें उलगडले असें आपण म्हणालात ते कसें ! हें माझ्या ध्यानात नाही आलें अजून ! "

सदानंदानें एक सुस्कारा टाकला व पुढें बोलण्यास सुरवात केली—

" विजय, माझ्या आयुष्यांतील एका आणीबाणीच्या क्षणीं ती देवता याप्रमाणें प्रगट झाल्यामुळे माझ्या मनानें असें घेतलें कीं, याच देवतेच्या साह्यानें, मार्गदर्शकत्वानें माझें आयुष्य योग्य मार्गाला लागेल. रातभर मी या गोष्टीवर विचार केला व सकाळच्या शांत वेळीं समोरच्या भिंतीवर ज्या ठिकाणीं मला तें दिव्य मुखमंडल दिसलें होतें, त्या जागेचें परीक्षण करूं लागलों. त्या जागीं रसिक मनाला वेड लावील अशी एक रम्य कृति टांगलेली होती. षोडश वर्षीय मनोज्ञ शकुंतला आपल्या लाडक्या वनज्योत्स्नेला पाणी घालीत आहे व शेजारीं थट्टा करीत उभ्या असलेल्या मिस्किल प्रियंवदेकडे

तिरप्या नजरेनें पाहून अर्धवट गालांतल्या गालांत हसत आहे, असा रम्य देखावा चित्रकारानें मोठया खुबीनें चित्रित केला होता. मामांनीं ती खोली प्रथम माझ्या ताब्यांत ज्या दिवशीं दिली त्या दिवशींच शकुंतलेच्या चेहऱ्यावरील त्या मोहक भावाने मी मोहित झालों होतो खरा; पण सूर्यप्रकाशाचे तेजोवलय भोंवतालीं पडल्यानंतर तिच्या चेहऱ्यांत जो विभूतिमत्त्वाचा अंश संचारला तो मात्र माझ्या त्यावेळीं अनुभवास आला नव्हता. माझी स्फूर्तिदेवता म्हणजे त्या चित्रांतली शकुंतला, हें स्पष्ट झाल्यामुळें माझें कार्य सुकर झालें असें मला वाटू लागलें. मोठया उल्हासानें, भावी यशाच्या व सुखाच्या कल्पनेनें हुरळून त्याच दिवशीं दुपारीं मामाचे घर सोडून मी मुंबईस आलों; कारण तें सुंदर चित्र मुंबईतील एका प्रसिद्ध छापखान्यांत छापलें गेलें होते.

" मुंबईस पोंचल्यानंतर ताबडतोब माझ्या बॅगच्या तळाशीं लपवून ठेवलेलें तें चित्र घेऊन मी बाहेर पडलों. त्या वेळच्या उत्साहाच्या भरांत एकएक पाऊल भावी सौख्यागाराच्या जवळ आपण जात आहों असें मला वाटत होते. पण हाय !—उलट अधःपाताची एकेक पायरी मी त्या वेळीं उतरत होतों, हें जर मला त्याच वेळीं कळलें असतें तर इतका उतावळेपणा न करतां माझ्या सुखस्वप्नांतच मी खात्रीनें गुंगत पडलों असतों. "

पुन्हा सदानंद थांबला. त्याचा स्वर जड व जास्त जास्त भिन्न होत होता. मध्येंच दिसूं लागलेला कथनाविषयींचा उत्साह पार माव-

ळून कशीतरी एकदां हकीकत संपवून टाकण्याची त्यास घाई झाली असावीसें दिसत होतें.

" विजय, ज्या छापखान्यांत ते चित्र छापलें गेलें होतें, त्याच्या मॅनेजरची मी गांठ घेतली. तें चित्र प्रथम पाच सहा वर्षांपूर्वी छापलें गेलें असल्याचें तेथें मला कळून आलें. ज्या चित्रकारानें तें चित्र काढलें होतें त्याने या छापखान्याचा आश्रय सोडल्याला दोन-तीन वर्षे होऊन गेलीं होतीं. तो चित्रकार त्या वेळीं कोठें होता याची मॅनेजरसाहेबाना कांहींच माहिती नसल्याचें दिसलें. माझी तीव्र निराशा झाली. माझी उत्सुकता पाहून मॅनेजरसाहेबानीं आपल्या छापखान्यातील इतर कामगारापाशीं त्या चित्रकाराबद्दल चौकशी केली. शेवटीं त्या चित्रकाराचा अर्धवट पत्ता काढून घेऊन मी मुंबई सोडली. त्या अर्धवट पत्त्याचा मला काहीं उपयोग झाला नाहीं; कारण त्या नव्या पत्त्यातील छापखान्याचा आश्रयही त्या चित्रकारानें एक वर्षांपूर्वी सोडून दिला होता. निराशेचा दुसरा धक्का मला बसला; पण या ठिकाणीं त्या चित्रकाराचा नवा पत्ता नक्की मला समजला. पुन्हां भटकत भटकत एकदाचा त्या चित्रकाराच्या वसतिस्थानांत मी येऊन पोंचलों.

" चित्रकाराचा पत्ता लागल्याबरोबर मला आनंद झाला खरा; पण तेव्ह[illegible] माझे धैर्य खचून गेल्यासारखें होऊं लागलें. कारण, तो चित्र[illegible] कल्पिल्यापेक्षां अगदींच निराळा माणूस निघाला. माझ्या तेज[illegible] पवित्र देवतेचें चित्र रेखाटणारा तिचा सेवक तिच्या प्रमाणेंच अत[illegible] शुद्ध व सुंदर असेल अशी माझी कल्पना होती;

पण तो तर अगदी हीन चारित्र्याचा, हलकट मनोवृत्तीचा असा मला दिसला. गुरवावरून देवतेची योग्यता ठरवावयाची हा काय वेडेपणा, अशी माझ्या मनाची कशीबशी समजूत करून त्या चित्र-काराशीं शकुंतलेच्या चित्राबद्दल मी चौकशी केली. हात बराच ओला झाल्यावर डोळे मिचकावीत त्याने मला ज्या मुलीवरून शकु-तलेचें चित्र काढले गेले होतें, तिचा पत्ता सांगितला. माझ्या देव-तेचा मुंबईतील तो पत्ता ऐकून मला कसेंसेच झाले; पण माझ्या नशिबाची एकदां शेवटपर्यंत परीक्षा पहावयाचीच असा निश्चय करून मी पुन्हा मुंबईस गेलो. ”

सदानंदाचा स्वर बोलतां बोलतां अगदीं खोल गेला. त्याची मान खाली खालीं जाऊन त्याचे तोंड मला दिसेनासें झालें होतें. सधिप्रकाश पार नाहींसा होऊन आमच्या समोरच्या समुद्राचा भाग पुन्हां उदासवाणा काळा बनला होता. सभोंवताली असणारे तुरळक लोक बहुतेक उठून गेले होते. एक प्रकारच्या अज्ञात भीतीने माझें हृदय कातर झाले होते. माझ्या शेजारून मंद, अस्पष्ट शब्द माझ्या कानांवर येऊन माझ्या मनावरची उदासपणाची छटा जास्तच दाट करीत होते.

“ माझ्या कातर हृदयाची भीति खरी ठरली होती. चित्रकारा-प्रमाणेंच त्याचा चित्रविषयही हीन होता. शकुंतलेचे ते मोहक चित्र एका वेश्येवरून काढलेलें होतें. मी दहा-पंधरा मिनिटेंच तिच्या समोर उभा होतों; पण तेवढ्यावरून ती अधःपाताच्या खोल दरींत

किती रुतली होती त्याची मला कल्पना आली. तिचें तेव्हां सुद्धा मोहक भासणारें लावण्य मला विषवत् वाटूं लागले.

" त्या दिवसापासून माझ्या जन्माची माती झाली. माझी विद्या, माझा उत्साह, माझ्या महत्त्वाकांक्षा, माझीं ध्येयें धुळीला मिळालीं. माझा दिव्य साक्षात्कार मद्यप्याच्या त्याच्या धुंदीत दिसणारीं तरळ चित्रें ठरला. आयुष्याच्या ऐन उमेदीत बसलेल्या त्या ठोकरीनें मी कोलमडून पडलों तों कायमचाच. तेव्हांपासून असा वेड्यासारखा गांवभर मी भटकत असतो. कुठेतरी खावें, कुठेतरी पडावे, असा माझा क्रम ठरून गेला. "

सदानंद स्तब्ध झाला. " पण सदानंद ", त्याच्या दीन विव्हळ मुद्रेकडे पाहून मी काहींतरी बोलण्याचा प्रयत्न करूं लागलो. सदानंदासारख्या बाणेदार, कर्तृत्वशाली तरुणाचा हा असा शेवट व्हावा, ही कल्पना मला सहन होईना. त्याच्या आयुष्यातील पहिली दिव्य स्फूर्ति केवळ भास– केवळ मृगजल ठरले, म्हणून काय त्यानें असेंच हताश होऊन पडावें ?

माझ्या मनांतील विचारांची ही दिशा जशी काय ओळखूनच सदानंद पुढें बोलूं लागला—

" माझ्या आयुष्यातील चमत्कारिक घटना म्हणजे परमेश्वराने किंवा दैवानें मला दिलेली सूचनाच होय, असे मला वाटले. वेळेवर मिळालेली ही सूचना समजून उरलेलें आयुष्य निष्क्रियतेत घालवावें, हाच शहाणपणा, असे माझ्या मनानें घेतलें. मी जगात कुठेंही कार्य

हातीं घेतले व तें साध्य करण्यासाठीं कितीही जिवापाड खटपट केली, तरी त्याचा शेवट कसा हीन होत जाईल, याची कल्पना मला देण्यासाठींच कोणातरी अदृश्य शक्तीनें तो चमत्कार मुद्दाम घडवून आणला असा माझा समज अद्यापि कायम आहे. कांहींतरी उच्च ध्येय साधण्यास समर्थ अशा प्रकारची दिव्य शक्ती माझ्या अंगीं नव्हतीच, असें या प्रसंगावरून उघड उघड सिद्ध झालें. आपल्या कर्तृत्वाच्या फाजील अभिमानानें पुन्हा काहीतरी नादी भरून फजीत पावण्यापेक्षां, असें निरुपद्रवी, रितें जीवन बरें, अशी मनाशीं गांठ घालून मी असा पृथ्वीच्या पाठीवर भटकत आहें. ”

अकस्मात् एक कुऱ्हाडीचा घाव लागल्यामुळें ऐन भरांत वठून गेलेल्या वृक्षाप्रमाणें सदानंदाच्या जीवनाची अवस्था झालेली पाहून माझें अंतःकरण करपून जात होतें. भावनांनीं आकुल झालेली मुद्रा व अश्रूंना अनभ्यस्त असलेले— पण आतां ओलावलेले— डोळे सदानंदाला दिसूं नयेत म्हणून मी बाजूला मान वळवली. मनावर पुरेसा ताबा मिळवल्यावर सदानंदाला पुन्हां जीवनोन्मुख करण्याचा प्रयत्न करून पहावा अशा उद्देशानें मी त्याच्याकडे वळलों व बोलूं लागलो—

“ पण सदानंद— ”

पण सदानंद माझ्या शेजारीं नव्हताच. मी चटकत् उठून सभोंवार पाहूं लागलों; पण चौपाटीवरील धूसर प्रकाशांत त्या संमिश्र जनसंमर्दांत तो माझ्या पुन्हां कसा नजरेस पडणार ?

---

# वरयोजना

"ए आऽई" अगदीं तालावर भोकांड पसरून गोस्या सारखा रडत होता. रबराचा चेंडू, लोंकरीचें झबलें गलोर्तें घातलेलें सिल्युलॉइडचें गोजिरवाणें बाळ, चांदीचा खुळखुळा अशी पांच सहा खेळणीं त्यान रागाने भिरकावून दिलेलीं आसपास अस्ताव्यस्त पडलीं होतीं. पेपरमिठाच्या दहा बारा वड्याहि इकडे तिकडे फिस्कारल्या होत्या. या सगळया उपकरणाच्या मध्यभागी गोस्यानें जमिनीवर लोळण घेतली होती व आईच्या नांवाचा तालस्वरांत जप चालविला होता. याच सुमारास नळावरून कळशी भरून घेऊन ती कडेवर सावरीत नमू खोलीच्या दारावरून चालली होती. गोस्याचा आक्रोश-ध्वनी कळशीमध्ये पडणाऱ्या नळाच्या धो धो आवाजामधूनही तिला पाच मिनिटे सारखा ऐकूं येत होता. त्यामुळे दाराजवळून जातां जातां किलकिल्या फटीमधून तिनें हळूंच कळे न कळे इतकें आंत डोकावून पाहिलें.

चाळींत हे नवीनच बिऱ्हाड आज ५।६ दिवस आले होतें. पण खोलींत बायकामाणूस कोणीच नजरेस न पडल्यामुळे त्या बिऱ्हाडाची बित्तंबातमी अजून चाळींतल्या चौकस बायकानासुद्धा काढायला मिळाली नव्हती. बिचाऱ्या बायकानीं वाढता वाढतां "कोण बाई नवं बिऱ्हाड आलं आहे तें ! तें पोर बिचारं सारखं रडत असतं.

कसं गोरंगोमटं आहे पण—" अशी हळूंच प्रस्तावना करून पाहिली होती. रात्रीच्या फराळाचे शेंगदाणे चावतां चावतां "कोणरे तो पोरास घेऊन एकटाच राहतोय ?" अशी म्हाताऱ्या आजीबाईंनीं उत्सुकतेने मुलापाशीं कित्येक वेळ गोष्ट काढली असेल. पण मुंबई-तल्या चाळींतील बायका जितक्या चौकस तितकेच पुरुष बेफिकीर असल्यामुळे सगळयाच बिचाऱ्या बायकांना हात जोडून स्वस्थ बसावें लागत असे. अशा सगळयाचा कौतुकविषय होऊन राहिलेल्या त्या खोलीच्या दारावरून जातां जातां नमूने हळूंच आत डोकावलें, यांत तिचा काय दोष ? पण नमू एकंदरींत जातीची धीट व चाणाक्ष खरीच. तेवढ्याच टेहळणीवरून आत मूल एकटेंच असावें असा तिने ताबड-तोब कयास बांधला. मग काय विचारतां ! तिनें कळशी खालीं ठेवली व दार अगदीं सताड उघडून खोलीत काय सामान आहे, कसें कसें आहे हे नीट लक्षपूर्वक पाहण्यास सुरवात केली. पण गोट्याचा तो त्रागा अन् त्याचें नांवाप्रमाणेंच गुटगुटित मोहक रूप हे पाहून तिची चौकस पोरबुद्धि पार मावळली व तिच्या मनांत गोट्याविषयीं एक प्रकारचे प्रेम उत्पन्न झाले.

तिनें जाऊन गोट्याला चटदिशीं उचलून घेतले अन् "उगा ऽ उगा, काय झ्यालऽ माझ्या बाळाला—हाऽतरे कुत्त्या" असें म्हणत म्हणत त्याला नाचवाउडवायास सुरवात केली. गोट्याहि गुलाम ताबडतोब गप्प राहिला. फार दिवस अंतरलेलें मऊ हात त्याला लागले म्हणूनच कीं काय कोण जाणे ! थोड्या वेळानें आपल्या

टाकून दिलेल्या खेळण्याशीं व खाऊशींहि त्यानें पुनः सहकारिता करण्यास सुरवात केली. नमूही त्या मायेच्या पसाऱ्यांत क्षणभर आपण कुठे आहों, कशाला आलों, हे पार विसरून गेली. वरचेवर गोट्याला हृदयाशीं धरून त्याचे मटामट पापे घेण्यांत ती अगदी गढून गेली होती. अशाच एका गोड क्षणांत असतांना "गोट्या, गोट्यारे" अशा खड्या स्वरांत हांका व जोडयाचा चट् चट् आवाज बाहेरून कानावर पडला. त्याबरोबर ती दचकली व चटकन् भानावर आली.

पदर सावरून, गोट्याला खालीं ठेऊन ती बाहेर झटकणार तोच अर्धवट उघडयाच असलेल्या दारांतून पंचविशीच्या सुमाराचा एक तरुण आंत शिरला. त्याच्या अंगात नुसता मलमलीचा पांढरा शुभ्र शर्ट असल्यानें त्याची रसरशीत अंगकांति व पीळदार बांधा स्पष्ट खुलून दिसत होता. तो नाकीडोळीं मोठा नीटस व तरतरीत असून त्याच्या डोळयात व जिवणीपाशीं एक प्रकारची मजेदार चमक होती.

आतले दृश्य पाहून तो बराच चमकला. भरांत आलेली गाण्याची लकेर तशीच सोडून गोट्याला खालीं ठेवण्याचा प्रयत्न करणाऱ्या नमूकडे व तिच्या आंगाला वानरासारखा बिलगून बसलेल्या गोट्या-कडे बघतां बघतां त्याच्या मनांत कसली तरी एकदम कल्पना आली. त्याचे डोळे जास्तच चमकूं लागले. पण तोंडावरचे हास्य दाबून उदासवाणा स्वर काढून तो म्हणाला,

"अरे वा ! या गुलामानें तुमच्याशीं बरीच गट्टी जमवलीय

म्हणायची ! बरोबरच आहे. आई वेगळं मूल— " पण बोलतां बोलतां त्याचा कंठ अगदीं गहिंवरून आल्यासारखा झाला. " हें पहा, हा तर तुम्हांला अगदींच सोडीत नाहीं, मग तुम्हाला वेळ असला तर घेऊनच जाना याला ? थोड्या वेळानें कंटाळला म्हणजे आपोआप लबाड येईल परत. तुम्ही याच आपल्या चाळींत कडेच्या खोलींत राहतां नव्हे ? "

" हो " असें कांहीं तरी उत्तरादाखल अर्धवट गुटमुळून नमी तेथून जीव घेऊन पळालीच. दारात ठेवलेली कळशी एका हातांत लोंबकळून धरीत व दुसऱ्या हाताने जड गोट्याला कसाबसा सांवरीत, अगदीं घामाघूम होऊन पण मोठ्या हर्षभरानें ती धांवतच आपल्या खोलींत आली. " आई ग आई, कळशी घे लवकर. पडली बघ " अशी तिची आरोळी ऐकून पार्वतीकाकू पार्टिशनच्या पलीकडे जरा आडव्या झाल्या होत्या त्या उठून पुढें आल्या व त्यांनीं कळशी तिच्या हातांतून घेतली. गोट्याला नमीच्या कडेवर पाहून त्यांना अगदीं स्वतःला नातू झाल्याप्रमाणें हर्ष झाला.

" अग, हा शेजारचा मुलगा नव्हे का ? ह्याला ग कुठनं आण-लास अन् कसा ? येरे बाळ माझ्याकडं. "

पण मोटूला नमूच जास्त पसंत पडली होती. त्याने एकदम मुर-कून नमूच्या खांद्यावर तोंड लपवलें. पार्वतीबाईना ही गंमत कोणाला सांगूं नी कोणाला नको, असें होऊन गेलें. तोंडाला पदर लावून हंसत हंसत त्यांनीं शेजारच्या चारपांच बायका बोलावून आणल्या.

त्या सर्वांनीं मिळून नर्मदाप्रताप सकौतुक ऐकला. नमूच्या साध्या सुध्या हकीकतीची दुसऱ्याच दिवशीं पार्वतीकाकूंनीं सटीक सुधारलेली आवृत्ति काढली.

" अहो, काय सांगूं ? नमी नुसती दारावरून चालली होती. तर तो पोरगा रडतरडत तिच्या पायाला मिठी घालून बसला. अहो, योगायोगाच्या गोष्टी बरं ह्या ! बापाच्या डोळयाला अगदीं पाणी आलं बघा, अन् म्हणाला " घेऊन जा बरं, तुमचाच आहे असं समजा. त्याची आई गेल्यापासून—" अन् त्याला पुढें बोलवेचना बघा. नमी आपली मुकाट्यानें पोराला घेऊन आली. तेव्हांपासून दिवसभर पोरगा नमीपाशीं असतो. "

आणि गोट्या दिवसभर नमीपाशीं असे खराच. आताशा साऱ्या दिवसांतहि बाबुराव त्याला घेऊन जाईनासे झाले. ' खानावळींतलं अन्न पोराच्या पोटाला लागतं ' अशा सबबीवर पार्वतीकाकू गोट्याला आतांशा दोन्ही तिन्ही वेळ जेवायलाहि आपल्याच घरी ठेवून घेत. निजायलासुद्धां गोट्या नमीपाशींच असे. पोरबुद्धीनें नमीनें गोट्याचा एखादे वेळेस कंटाळा केला तर पार्वतीकाकू वाघासारख्या तिच्या अंगावर चवताळून जात.

" अग, घे त्याला. खबरदार असं हिडिस फिडिस केलंस तर. एव्हांना उजवली असती तर तुला नसतं कां झालं एक पोर ? कांहीं म्हणतां कांहीं अक्कल नाहीं कार्टीला. कसलं सोन्यासारखं स्थळ आपल्या पायीं चालून आलंय. पण हिच्या कपाळीं आहे कीं नाहीं

माहिती कुणाला ? जरा म्हटलं बाबुराव ह्पिसांतून येण्याचे वेळेस वेणीफणी करून गोट्याला घेऊन दारांत उभी राहात जा, तर कधीं ऐकत नाहीं कार्टी."

पार्वतीकाकूंचा हा कावा शेजारपाजारच्या बायकांच्या ध्यानात आला होता. अन् पार्वतीकाकूंच्याही तोंडात कधीं तीळ भिजत नसेच. बाबुरावाच्या स्थळाची चर्चा सगळ्या बायकासमोर त्या मोकळेपणानें करीत. बाबुरावापाशीं मात्र त्यांनीं अजून उघडपणें गोष्ट काढली नव्हती. बाबुरावच त्यांच्यापाशीं बोलण्याचें नेहमीं टाळीत. गोट्याच्या आईबद्दल हकीकत विचारायची पार्वतीकाकूंना कोण उत्सुकता होती. पण गोट्याच्या आईचे नांव निघाल्याबरोबर बाबुरावांनीं असा एक मोठा सुस्कारा टाकावा व दस्तरुमालानें डोळे टिपावेत कीं पार्वतीकाकूंना जास्त कांहीं बोलण्याचें अतिपरिचयाच्या अभावामुळें धाडसच होत नसे.

पण बाबुरावाना विचारण्याखेरीज बाकीच्या सगळ्या गोष्टी त्यांनीं मनामध्यें केव्हाच ठरवून ठेवल्या होत्या. बाबुरावांच्या गोत्रांशीं आपलें जमते कीं नाहीं, पत्रिकेची बाब कशी वरचेवर उडवून द्यायची, आणखी एकदोन खोल्या तात्पुरत्या घेऊन चाळींतल्या चाळींतच लग्न कसें उरकून घ्यायचें, नमीचा बाबुरावांच्या त्या खोलींत संसार कसा थाटून द्यायचा, नंतर गोट्याला आपल्याकडेच ओढून घेऊन त्याचा नमीच्या संसारांत अडथळा येणार नाहीं, अशी व्यवस्था कशी करायची, याचा सगळा विचार त्या कर्तबगार बाईनें

तेव्हाच करून ठेवला होता. शेवटीं माघ अगदीं तोंडाशीं आला असें पाहून एक दिवस दुपारीं वाती करीत असतां त्या दिवशीं रात्रीं बाबुरावांपाशीं गोष्ट काढण्याचें त्यांनीं अगदीं ठरवलें. हळूं हळूं बाबुरावांचें मन कसें वळवायचे हें अगदीं सगळें मुद्देसूद ठरवून त्या आपल्या मनांत त्याची रंगीत तालीम सुद्धा करून पाहत होत्या.

"हें पहा बाबुराव, आता तुम्ही एकटे तरी किती दिवस राहणार ? तरुण वय तुमचं; शिवाय सोन्यासारखं एक पोर पदरी. पुष्कळ वाईट वाटतं माणसाला. पण जगाच्या रहाटीप्रमाणं सगळं करायला नको कां ? चांगला शे सवाशे दरमहा आहे तुम्हांला असंही ऐकलं कुठस परवा. मग कां बरं जिवाचे उगीच हाल करून घेता ? दुःखांत कुठे फार सोधासोध करायलाही नाही सांगत मी. आमची नमी पदरांत घेत असला तर बघा. आईचा गळा मोकळा होईल, पोर संसाराला लागेल, अन् तुमचंही कांहीं वाईट नाहीं. आतां आमची नमी म्हणजे तुम्हांला ठिगळच आहे म्हणा— पण मुख्य काय पहायचं तुम्हाला ? पोराचं सुख—होना ? मग पाहतांच आहा कीं आतांशा गोट्ट कसा असतो नमीला धरून तो ? माझा जीव तरी त्या पोरासाठींच तुटतोय...... "

पण त्याची ही गोड विचारशृंखला नमीच्या दणदण् येण्यानें ताबडतोब तुटली. नमी अगदीं गडबडीने कुठुनशी आली होती. तिच्या तोंडावरून तिला कांहीं तरी फार महत्त्वाचे सांगावयाचें होतें असें दिसलें, पण जलद चालण्यानें तिचा दम छाटत नव्हता आणि

काय कसें सांगावें याचाही गोंधळ पडल्यासारखें झालें होतें. " अग, काय, झालं काय ? " असें पार्वतीकाकूंनीं जेव्हां चांगलें पांचसहा वेळ तिला विचारलें तेव्हां मोठ्या कष्टानें एकदाची नमी म्हणाली

" अग किनई, आपल्या चाळीपुढे एक गाडी उभी राहिलीय. त्यांत एक छान सुरेख बाई बसलीय; अन् तिच्या मांडीवर किनई एक तान्हं अगदीं चिमुकलसं बाळ आहे, अन् तिच्याजवळ– " नमी पुन्हां घोटाळली आणि लाजली.

" अग मग काय, बोल कीं लवकर. जशी कांहीं गोष्टच सांगतीय् त्या नव्याकाळांतली. कुणी पाहुणे कां आलेत आपल्याकडे ? " पार्वतीकाकू उतावीळपणे म्हणाल्या.

" नाहीं ग " जोरानें मान हलवून नमी म्हणाली. " आणखी त्या गाडींत आपल्या चाळींतले ते......ते......गोट्याचे वडील आहेत. "

" हं. हं. अग मग बाबुरावांची बहिण बिहिण पाहुणी आली असेल. अहा ग वेंधळे, मग भागुबाईसारखी पळून कशाला आलीस ? त्याच्या चागलं पुढं व्हावं, बोलावं, चालावं, तें राहिलं बाजूला. चल, पाहूं दे तरी कुठं आहे ती. बरं झालं बाई आली ती. बायका बायकांत गोष्ट काढायला बरं असतं जरा. "

" अग थांब आई " नमी म्हणाली, " खरी गंमत ती पुढेंच आहे. मी गोट्याला घेऊन उभी होतें दारांत. गोट्यानें त्या बाईला पाहिलीन् मात्र, अन् अशी उसळी मारलीन् माझ्या कडेवरून ! अन्

खालीं उतरून "आई ग, आई ग" करीत धावत तिच्याकडं गेला. अन् ती बाई पण त्याला उचलून त्याचे मुके घेत रडत म्हणाली, "माझं बाळ तें. कुठं ग गेलं होतं मला इतके दिवस सोडून !"

ऐकतां ऐकतां पार्वतीकाकू आश्चर्यानें व संतापाने अगदीं तटस्थ झाल्या.

"नमे कारटे, सांगतेस तरी काय हें ! शुद्धीवर आहेस ना ? का भ्रमबिम झालाय तुला ? अन् कारटे, हीच का तुझी मोठी गंमत ? एवढी घोडी झालीस, पण स्वतःच्या हिताचीसुद्धां काडीइतकी अक्कल नाहीं तुला. म्हणे कसली छान सुरेख बाई आहे. अग ती म्हणजे तुझ्या संसारांतली एक छानशी धोंडच आहे म्हण ना ? दम धर, कुठं आहे ती दाखव पाहूं. अन् तो मेला मानभावी बाबुराव कुठं आहे तोही पाहू दे. गोड बोलून गळा गोवला मेल्यानं. चांगला नक्षा उतरते त्याचा. या पार्वतीशीं गाठ आहे म्हणावं. फिर्याद गुदरीन फिर्याद. ठाऊक नाहीं अजून."

असें सं[illegible]न बडबडत मांडीवरचा कापूस पार्वतीकाकूंनीं पार फिस्कारून [illegible] एखाद्या नागिणीप्रमाणें फोफावत सपाट्यानें त्या चाळीच्या [illegible]टकाकडे निघाल्या. बिचारी नमू काय बोलणार ! अ[illegible] अनर्थ होतो म्हणून दारातून डोकावीत, डोळे निपटीत [illegible]टयानें. पार्वतीकाकू ज्या निघाल्या त्या थेट गाडी अ[illegible] होती तेथें येऊन थडकल्या. तेथें कमरेवर हात ठेवून, अ[illegible]ज्यात उभ्या राहून त्या लालभडक डोळ्यांनीं तेथें

चाललेल्या प्रकाराकडे पाहूं लागल्या. त्यांना पाहिल्याबरोबर बाबुराव आपल्या बायकोजवळ हळूंच कांहीं तरी कुजबुजले. तिनें लागलीच पार्वतीकाकूंकडे वळून पाहिलें व चटकन् आपल्या हातांतल्या तान्ह्या मुलाला बाबुरावाजवळ दिलें. पार्वतीकाकूंच्या जवळ जाऊन तेथे रस्त्यातच खालीं वाकून तिने त्यांना नमस्कार केला व मृदु, लाघवी शब्दात ती बोलूं लागली --" तुम्ही अन् नमूताईनीच ना संभाळला गोट्याला ? खरच काकू, तुम्ही होता म्हणूनच माझा गोटया मला आज पुन्हा दिसला बर. " गोट्याच्या आईचे डोळे पाण्यानें भरून आले. तिची ती करुण आणि लाघवी मूर्ति पाहून पार्वतीकाकूंचा अर्धा राग त्याच्या न कळत विरघळून गेला.

" हं, ह, मला हो कशाला नमस्कार ? सौभाग्यवती भव, पाच पुत्राच्या आई व्हा. " असें त्या सहज पुटपुटून गेल्या.

डोळे पुसून काढून गोटयाची आई पुनः बोलूं लागली --

" काकू, गोटयासाठी माझा जीव असा तीळ तीळ होत असे म्हणून सागू. पण मी तर इस्पितळात पडलेली. आठवडावर दोन जीव कडे वेगळे होतात अशी सगळ्याना काळजी होती. पुढेंसुद्धां महिना दीड महिना माझ्या जगण्याची अगदीं शाश्वती नव्हती. मग गोटय [illegible] मी कसचा आपल्यापाशी ठेऊन घेणार ? वर्षा सव्वा वर्षा[illegible] लेकराचं पुरुषमाणसाच्या हातून काय होणार ? अन् एक माहेर[illegible] कां सासरचं, कुणी म्हणता कुण्णी बोटाएवढं माणूस नाही. पण [illegible], तुम्ही दोघीं आज माझ्या माय- बहिणी झालांत बरं. देव

कुणाच्याना कुणाच्या तरी मनीं मुखीं उभा राहतो तो असा—काकू किती तुमचे उपकार या तुमच्या मुलीवर झाले म्हणून सागूं ! ”

“ अहो, छे, त्यांत कसले उपकार ” त्या मनापासून आलेल्या कळवळ्याच्या उद्गारांनीं पार्वतीकाकू या वेळेपर्यंत पार विरघळून गेल्या होत्या. ‘ शेजारधर्मच आहे हा. वेळेला उपयोगी पडत नाहीं तें माणूस कसलं जळलं. बाबुराव कांहीं बोलले नाहींत हो कधी तुमच्या दुखण्याबद्दल ? नाहीं तर मी समाचाराला नसते कां आले इस्पितळांत ! पण चला आतां घरांत. दुखण्याचं अंग अन् बाळंतीण बायको; वाऱ्यावर नका उभ्या राहू. दमा अं दाराशीं जरा–मी नमीला तुकडा ओंवाळून टाकायला सांगतें ”—असे म्हणत काकू लगबगीनें निघून गेल्या.

“ म्हणजे हे काय ? ” गोट्याची आई विस्मयानें बाबुरावांकडे बघून म्हणाली, “ माझ्याबद्दल कांहीं सांगितलं नव्हतं याना ? ”

बाबुरावांच्या डोळ्यांतली नेहमीची मजेदार चमक आतां फारच चमकून दिसत होती. मिस्किलपणाने हंसत हंसत ते म्हणाले—

“ वेडी रे वेडी. मी असं सगळं सागून टाकलं असतं तर गोट्याची पीडा त्या दोघींनीं कशाला आपल्यामागें लावून घेतली असती ? मी गेलो होतों गोट्याच्या रडक्या छळवादानं कंटाळून, म्हणून काढली ही छानदार युक्ति पण तूं तर आतां अगदीं बाजू राखलीस बुवा ! मी म्हटलं काय आतां म्हातारी आग लावून देते ही. शाबास, बायको असावी तर अशी असावी. ”

"पुरें झालं" गोट्याची आई मंद स्मित करीत म्हणाली "मला कांहीं आपल्या युक्त्या बिक्त्या ठाऊक नाहींत कांहीं. मी म्हटलं तें सगळ खऱ्या भावानं हो. मी झालें, या काकू झाल्या, आम्ही आपल्या भोळ्या, सरळ बायका. ती फसवाफसवी, युक्त्या ते सगळं पुरुषाना माहीत. बरं चलावं आतां घरांत."

बाबुरावही पाठीमागून निघालेच पण जाता जातां "तूं अन् काकूंसारख्या सरळ बायका? अरे बापरे, काकूसारख्या साध्याभोळ्या सगळ्याच बायका असल्या तर..." असे कांहीसें खोडसाळपणानें ते पुटपुटतच होते.

———

# आत्मदान

"अभिनदनीय विवाह"—प्रकाशाचा ताजा अंक चाळता चाळतां वरील सदराकडे माझें सहज लक्ष गेलें व कुतूहलाने हा अभिनंदनीय विवाह कुणाकुणामध्यें झाला हें मी पाहूं लागलों. प्रकाशाच्या बातमीदाराने विवाहाची हकीकत मोठी सविस्तर व खुलवून लिहिली होती. वधूवराच्या प्रौढत्वाची व सुशिक्षितत्वाची भेरी उच्च स्वरानें प्रथम वाजवून नतर नाजूकपणें हा प्रीतिविवाह असल्याचें त्यानें सुचवलें होतें. विवाह प्रीतिविवाह होता हे 'प्रकाश'च्या बातमीदाराला कसें कळलें हा प्रश्नच होता. अर्थात् 'प्रकाशा'च्या बातमीदारानें आपल्या तरल तर्कशक्तीने हें मनोवेधक अनुमान काढलें असावें. वधूवर चांगलींच प्रौढ, शिवाय पदवीधर, तेव्हा त्यांचा विवाह वडील माणसांच्या ठरवाठरवीनें झाला असेल हे शक्यच नव्हतें. मग साहजिकच कोणा वडील माणसांनीं न ठरवलेलें लग्न म्हणजे प्रीतिविवाह अशी त्या बातमीदाराची प्रामाणिक समजूत असल्यामुळें त्यानें बेलाशक या विवाहाला प्रीतिविवाहाच्या सदरांत लोटून दिलें असावें. अर्थात् वधूवरांचीही या वर्गीकरणाला कांहीं हरकत नसणारच. 'प्रीतिविवाह' असें गोडस नांव आपल्या विवाहाला लावलेलें कोणाला आवडणार नाहीं? आणि शिवाय आपला विवाह प्रीतिविवाह आहे किंवा नाहीं याची विचक्षणा त्यांनी

तरी कुठं मनाशी करून पाहिली असेल ! ती सुशिक्षित वधूवरें कितीही प्रगल्भ व प्रौढ विचारांचीं असलीं तरी या विशिष्ट विषयाचा त्यांनीं सूक्ष्म रीतीनें विचार केलाच असेल, असे थोडेच आहे ! मी आपल्याशींच किंचित् अभिमानानें हंसलो. कारण या विषयांत आपल्याला फार समजतें; आपण या विषयाचा फार बारीक अभ्यास केला आहे असा मला मोठा गर्व होता. पण ज्या प्रसंगानें मला हे अनुभवजन्य ज्ञान मिळवून दिले होतें तो प्रसंग काही आनंददायक नव्हता; त्यामुळें माझ्या तोंडावरचे अभिमानाचें हसूं दुसऱ्याचक्षणीं मावळून त्याची जागा एका दीर्घ उसाशानें घेतली.

या प्रसंगानें जागृत झालेली माझी पूर्वस्मृति ताबडतोब पुन्हां सुप्तावस्था पावणें, माझ्या कितीहि मनांत असलें, तरी असंभवनीयच होते. माझ्या इच्छेविरुद्ध माझ्या स्मृतीनें माझ्या पूर्वायुष्यांतील एका दृश्याचीं अंगोपांगे हळूंहळूं उलगडण्यास सुरुवात केली.

त्यावेळीं मी ताज्या दमाचा, तडफदार विचाराचा व धडाडीच्या धोरणाचा असा एक पंचविशीचा तरुण होतों. माझ्या भोंवतालचें वातावरण त्यावेळीं इंद्रधनुष्यांतील विविध रंगांनीं रंजित होऊन गेलें होतें. माझ्या हल्लींच्या जगाप्रमाणे एकमेव धूसर छटा त्यावेळीं त्याच्यावर पसरलेली नव्हती. निरनिराळ्या रंगांनीं रंगून निघालेल्या माझ्या भोंवतालच्या अखिल वस्तूंवर प्रामुख्यानें एक प्रकारची लालसर गुलाबी रंगाची छटा सदैव तरंगत असे. परमोत्कट प्रणय हा माझ्या तरुण जीवनाचा उच्छ्वास बनून राहिला होता; या प्रणयभावनेची

अधिष्ठात्री देवता माझ्या मनाजोगी अशी मला आढळून आली होती, आणि ती कायमची आपलीशी करण्याची मला पूर्ण खात्री वाटत होती.

माझी उषा—त्यावेळीं मला माझी भासत असलेली उषा— म्हणजे माझ्यासारखीच तडफदार, उच्च ध्येयवादानें रसरसलेली, जवळजवळ समवयस्क अशी एक तरुणी होती. तिचीं व माझी मतें प्रत्येक बाबतींत अगदी बरोबर जुळत; कोठलेंही काम करण्यास तिचें व माझें पाऊल बरोबर पुढें पडे; अंगीकृत कार्याचा अनुकूल, प्रतिकूल काय तो शेवट होतांच आमच्या दोघांच्या मनांत अगदी एकाच प्रकारच्या भावना खळाळत. अशा रीतीनें आमच्या दोन हृदयातून एकच प्राण, एकच श्वासोच्छ्वास खेळत असल्याबद्दलची खात्री असल्यामुळें आमचीं भावी जीवनसूत्रें निरामयपणें एकत्र गुंफिली जाणार याबद्दल मला मुळींच शंका वाटत नव्हती. या आधींच पटलेल्या पक्क्या मनोमन खुणेमुळें या विषयाबद्दल उघड उल्लेख मात्र, योग्य प्रसंगाच्या अभावीं, मी अद्यापि कधीं केला नव्हता.

पण असा योग्य प्रसंग लवकरच आला. माझा शिक्षणक्रम सुरळीतपणें पार पडून मला परप्रांतीं नौकरी लागली. या गोष्टीचें माझ्या आयुष्यांतील महत्त्व, उषेच्या व माझ्या विरहाचा हा प्रथम प्रसंग या दृष्टीनेंच मला प्रथम जाणवलें. पण हा प्रथम विरह सुद्धा कांहीं सर्वस्वीं अपरिहार्य नव्हता. माझ्या प्रयाणकाळाच्या याच प्रसंगीं उषेच्या व माझ्या भावी संसारयात्रेचें शुभ प्रस्थान ठेवणें आम्हां

दोघांना किती तरी सुलभ व सुखकारक होतें !

या मनोदयानुरूप एका सायंकाळीं उषा व मी आमच्या नेहमीं-च्या आवडत्या नदीतीरावर सहल करीत असतां मी माझ्या विष-याचा प्रस्ताव केला. बोलण्यास सुरुवात मी पूर्ण आत्मविश्वासानें व यशाच्या खात्रीनें केली. पण, हाय, माझ्या आयुष्यातील अत्यंत मह-त्वाच्या प्रकरणाचा काय शेवट होणार आहे याची अंधुकशी कल्पना जरी मला त्या दिवशीं प्रथमच्च झाली असती, तर त्याचा प्रारंभच करणें मी खात्रीनें टाळलें असतें व माझ्या आयुष्यांतील प्रथम भागांतील अनिश्चिततेच्या गोड वातावरणांत अनेक दिवस गुटमळत राहण्याचें मी आनंदानें पत्करलें असतें !

" उषे, माझ्या अर्जाचें उत्तर आलें. आठपंधरा दिवसांत मला अलाहाबादला हजर झालें पाहिजे. " मी म्हणालों.

" खरंच आलं उत्तर ! केव्हा, सकाळीं ! छान झाल" खरोखरी मनापासून आनंदून उषा म्हणाली. " सुरेख जागा मिळाली तुम्हाला. पगार भरपूर, रिसर्च करायला उपकरणांची संपूर्ण अनुकूलता, हवा तेवढा वेळ रिकामा आणि पूर्ण स्वातंत्र्य — वा छान, कित्ती थोड्या खटपटीनें तुमच्या आयुष्यांतील महत्त्वाकांक्षा सफळ झाली एकदम !"

उषेचा माझ्या उत्कर्षाविषयींचा आनंद पाहून माझें मन सुखा-वलें तर खरेंच. पण या नौकरीमुळें मला उषेपासून कितीतरी दूर जावें लागणार यामुळें माझ्या मनाला सकाळपासून जी आत्यं-तिक हुरहूर लागून राहिली होती तिचा अंशमात्रही उषेच्या मुद्रेत न

आढळल्यामुळें माझ्या मनाला निराशेचा एक लहानसा धक्का बसला. हा धक्का म्हणजे आगामी दारुण निराशेचा सूचकच होता म्हणायचा. पण अर्थातच त्यावेळीं मला अशी शंका येण्याचें कारणच नव्हतें. त्या बारीकशा निराशेच्या चटक्याने माझी सकाळपासूनची हुरहूर जरा जास्त तीव्र झाली एवढेंच.

"होय, उपे," मी काहीशा तीव्र स्वराने म्हणालो, "माझ्या सगळ्या बौद्धिक महत्त्वाकांक्षा पूर्ण होण्याचा रंग दिसतो आहे खरा. पण 'हृदय' म्हणून माणसाच्या साडेतीन हात लांबीच्या देहांत एक मुठीएवढा भाग असतो, हें तुला आहे ठाऊक, उपे?"

माझ्या या अनपेक्षित पूर्वापरिचित विपण्ण, वैतागपूर्ण स्वराने उपा चमकली. "म्हणजे, हे काय नवीनच काढल आहेत आज?" किंचित् खेदाने, कुतूहलाने व काहींशा चेष्टेच्या स्वरानें तिनें प्रश्न केला.

"उपे" मी भावनांचा उमाळा एकदम उचबळल्यामुळें बोलूं लागलों. "आपल्या एकमेकाविषयींच्या भावनांना रुक्ष, जडदेही शब्दांचीच जोड दिली पाहिजे कां? उपे, आठपंधरा दिवसांनीं मी तुझ्यापासून दूर जाणार, आणि परत केव्हा येणार, देव जाणे! वर्ष-सहामहिन्यानी दोघांची मोठ्या मुष्किलीनें तुटपुंजी गांठभेट व्हायची! आणि तुला न् मला तर एक दिवससुद्धा एकमेकांवाचून चैन पडत नाहीं. या विचारानें सकाळपासून माझ्या हृदयात कशी कालवाकालव होत आहे!"

"आणि मला त्याबद्दल वाईट वाटत नाहीं, असं का तुम्ही सम-

जतां, विभाकर ?" उषा माझ्या भावनाविष्काराने द्रवून मृदु स्वरा
म्हणाली. "पण मी तुमच्यासारखी भावनाप्रधान नाहीं, एवढंच
कोठल्याही गोष्टीचा विचार करताना तिची व्यावहारिक बाजू माझ्य
नजरेंत चटकन भरते. तुमची दृष्टि मात्र नेहमीं रोजच्या, साध्यासुध्य
गोष्टींतसुद्धां पार्थिव अंश टाळून ध्येयवादाच्या प्रांगणांत भराऱ्य
मारीत असते." उषा क्षणभर थाबली. आमच्या दोघांच्या जगावि
यींच्या दृष्टिकोणांतील हा फरक खरा आहे कीं नाही याचें ती पुन
जणू काय मनन करून पहात होती. मीही साश्चर्य कुतूहलानें तिन
आमच्या दोघाच्या मनोभूमिकेची चिकित्सा ऐकत होतो. आम
दोघांच्या स्वभावांत असा हा फरक असेल असे माझ्या कधीं ध्यानी
मनीही नव्हते. पण तिचें हें बोलणें ऐकतांना या स्वभावभिन्नत्वामु
आमची दोघांची मनें व जीवितें कधी काळीं कायमचीं तर दुरावणा
नाहीतना, असा आशंकेचा दुसरा जरा जोराचा धक्का माझ्या मना
बसला.

"आणि हे पहा विभाकर," मूलभूत सिद्धाताचा तात्त्विक ख
बाजूला ठेवून प्रस्तुत विषयाकडे ताबडतोब वळण्याच्या तिच्या ने
मींच्या पद्धतीप्रमाणें उषा म्हणाली, "हे असें केव्हां तरी व्हायचे
होते, नाहीं का ? आपलीं बाळपणचीं घरें एका गांवांत पडली, आपल
विद्यार्थिदशेचीं वर्षे एका शिक्षणसंस्थेंत घालवायची संधि मिळा
म्हणून आपण इतकीं वर्षे एका ठिकाणीं खेळीमेळीनें राहूं शकले
पण शिकलेली विद्या आणि मिळवलेलें ज्ञान यांची चाचणी व अ

भवजन्य पूर्णता दोघांचीही एकाच क्षेत्रांत व्हावी, असा योग येण
कठीण, किंबहुना अशक्यच नाहीं कां ? आतां त्यांतून मलाही तुमच्या
अलाहाबादला एकादी नौकरी तुम्ही आपल्या वशिल्यानें लावू
दिलीत तर मात्र आपला ऋणानुबंध असाच चालू राहील खराच."

उषेचें हे भाषण ऐकून मी चांगलाच आश्चर्यचकित झालों. जण
आपण त्या गांवचीच नव्हे असे हें बोलणें ती खरोखर मनापासू
बोलत आहे किंवा स्त्रीसुलभ संकोचानें माझ्या डोळ्यांपुढें सूर्यप्रकाश
प्रमाणे ढळढळीत दिसणाऱ्या गोष्टीकडे ती डोळेझाक करीत आहे
किंवा स्त्रीजातीस नैसर्गिक असलेल्या पटुत्वानें माझ्या मनाचा ठा
ती मुद्दामच असे मोघम बोलून पाहात आहे, याची छाननी म
तिच्या चर्येकडे पाहून करण्याचा प्रयत्न करूं लागलों. पण तिच्य
मुद्रेवर मनःपूर्वकता व कळकळ याच्यापलीकडे दुसऱ्या कोठल्याहे
भावनेचे प्रतिबिंब मला दिसून येईना. नाहीं म्हणायला शेवट
वाक्य उच्चारतांना मात्र अर्धवट विनोदाची व अर्धवट कावेबाज
पणाची बारीकशी छटा तिच्या तोंडावर जराशी चमकून गेली होती

उषेने मला जाणूनबुजून नुकतेंच भावनाप्रधान ठरवलेंच होते
मग माझ्या भावनावर नियंत्रण घालण्याचा प्रयत्न मी उगीच तिच्या
समोर कशाला करूं ? तिच्याकडे एक तीव्र दृष्टिक्षेप टाकून मी बोल
ण्यास सुरुवात केली.

"या शिवाय दोघानीं एकत्र राहण्याचा दुसरा कांहीं उपाय तुल
अगदीं जसा कांहीं ठाऊकच नाहीं ना उषे ? उषे," माझा भावन

वेग अनावर होऊन मी चट्कन् तिचा हात आपल्या हातांत घेतला. "तुला तेथें नौकरी पाहून देण्यापेक्षां मीच तुझा आजन्म सेवक बनून तुझ्या सेवेला, सुखसमृद्धीला माझें सर्वस्व अर्पण केलें तर तुला ते जास्त आवडणार नाही का ? उषे, का उगीच असे वेड पांघरतेस ?" उषेनें चमकून आपला हात माझ्या हातातून सोडवून घेतलेला पाहून आवेशाने मी पुढें बोलूं लागलों, "आपल्या दोघांच्या दीर्घकालीन दृढस्नेहाचें परिणत स्वरूप विवाहावस्थेतच होणार अशी आपल्या दोघांच्या मनोंमनी साक्ष केव्हांच पटून गेली नव्हती कां ? तुझ्या मनाला तिची कदाचित् प्रथम स्पष्ट जाणीव झाली नसेल." उषेच्या गोंधळलेल्या मुद्रेकडे पाहून मी आर्जवी मृदु स्वराने म्हणालों, "पण आतां तर ती स्पष्ट झाली ना ? तें कांहीं नाही उषे, माझा तर अगदीं दृढनिश्चय झाला आहे कीं तुला सोडून एकटें अलाहाबादेला जायचेंच नाहीं. तूं विचार करायला म्हणून एकादा आठवडा पाहिजे तर खुशाल घे. तोवर मी इथें राहीन आणि तुला पूर्ण माझी करूनच तुला घेऊन नोकरीवर जाईन."

माझें हें निरनिराळ्या संमिश्र भावनांनीं भरलेले भाषण चालूं असतांना उषेच्या चेहऱ्यावरहि तदनुरूप निरनिराळे फरक होत होते. माझ्या भाषणांतील शेवटचा आत्मविश्वासाचा व आशापूर्ण स्वर ऐकून मात्र तिची मुद्रा मनाशीं कांहीं तरी ठरवल्याप्रमाणें निश्चयी बनली. माझ्याकडे स्थिर व करारी दृष्टीनें— त्या दृष्टींत माझ्याविषयींच्या अनुकंपेचाही किंचित् भास होत होता— पाहात तिनें मान

हलवली व ती शांतपणें म्हणाली,

" छे, विभाकर, मला विचार करायला मुदतीची जरूरच नाहीं मुळीं. माझें उत्तर आतां तयार आहे."

या तिच्या प्रिय व अनुकूल उत्तराने मी ताबडतोब आनदाने हुरळून जायचा, पण तिचा चेहरा व स्वर यांमधील गांभीर्याने माझें मन उलट जास्तच कातर झाले.

"या विषयावर मी कधीं पूर्वी विचार केलेला नाहीं, असें मुळींच नाही. पण तुम्ही म्हणता ती दिशा मात्र माझ्या विचारांना विचारांतीं लागली नाही. स्पष्टच सागायचें, विभाकर, म्हणजे तुमच्याशीं विवाह अर्थीनें बद्ध होण्याचा विचार मला श्रेयस्कर वाटला नाहीं व म्हणून तो विचार मी कधींच सोडून दिला."

मेघपटल फाडून वर गेलेलें विमान अकस्मात् त्याचा पखा बद पडून त्वरेनें खालीं घसरूं लागलें म्हणजे त्या दुर्दैवी वैमानिकाच्या मस्तकात कसल्या भिन्नभिन्न विचारांचें व भावनाचे चक्र भ्रमण करीत असेल याची बरोबर कल्पना मला तें उषेचें उत्तर ऐकून आली. उषेच्या शात व करारी मुद्रेवरून तिच्या आतांच्या निश्चयात अणुरेणूही फरक होणें शक्य नाहीं, हें अगदी उघड दिसत होतें. मी निराशोद्वेगानें अडखळत उद्गारलो,

" उषे, मग आपली परस्पराशीं इतक्या दिवसाची प्रेमाची वागणूक म्हणजे निव्वळ देखावा, फसवणूक झाली होय ! खऱ्या प्रीतीचे चैतन्य लवलेशही त्यांत खेळत नव्हते, म्हणतेस ! "

" भलतंच एखादं " उषा स्मित करून म्हणाली. " उलट आपणा दोघांमध्यें आत्यंतिक, उच्च प्रकारची प्रेमभावना वास करीत असल्यामुळेंच आपला विवाह होणें इष्ट नाहीं असं मी ठरवलं. "

आपल्या या विलक्षण व प्रथमदर्शनीं विपर्यस्त वाटणाऱ्या विधानानें मी आश्चर्यानें गुंग होईन अशी उषेची अपेक्षा असावीच. कारण, तिनें ताबडतोब, मी कांहीं बोलण्यापूर्वीच माझ्या गोंधळलेल्या मुद्रे-कडे बघत बघत आपल्या चमत्कारिक मताचें समर्थन करण्यास सुरुवात केली.

" हे पहा विभाकर, प्रत्येक व्यक्तीला आपले व्यक्तिमत्व म्हणून कांहीं असते. हे व्यक्तिमत्व, हळूंहळूं उत्कृष्ट रीतीनें, विशिष्ट दिशेनें दिवसेंदिवस जोरकस व्हाव हा, आपला विद्यार्थिदशेतला प्रयत्न असतो, नाही का ? आपल्या व्यक्तित्वाचा सर्वांगीण विकास हीच आयुष्याची पूर्वतयारी; नंतर आयुष्याच्या उत्तरार्धात या व्यक्तित्वाच्या विशुद्धतेची अनुभवाच्या निकषग्रावेवर कसोटी व्हावयाची. याप्रमाणे परिस्थितीच्या भोवऱ्यातून जास्तच दिव्य व पूर्ण बनून व्यक्तीचें व्यक्तित्व प्रगट झाले म्हणजे त्या व्यक्तीच्या आयुष्याची सार्थकता झाली असे मी समजतें. उलट या चक्रात जर मनुष्याच्या व्यक्ति-त्वाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडून तें माती मोल झालें तर तो मनुष्य माणुसकीला मुकला, जगाच्या बाजारांत नालायक ठरला, अशी माझी समजूत आहे. स्वतःची अशी कवडी मोल किंमत करून घेण्याची माझी इच्छा नाहीं. मला माझ्या व्यक्तित्वाचा उज्ज्वल उत्कर्ष करून

तें अभंग राखावयाचें आहे. यामुळेंच मला तुमच्याशीं लग्न करतां येणार नाही. ”

तिच्या विचारसरणींतील कार्यकारणभाव माझ्या नीट ध्यानात आला कीं नाहीं हे पाहण्याकरितां तिनें माझ्याकडे सूक्ष्म नजरेनें पाहिले. पण माझा चेहरा पूर्वीप्रमाणेंच विमनस्क व संत्रस्त पाहून ती आपले विचार आणखी स्पष्ट करूं लागली.

“ विभाकर, तुमचें माझ्यावर व माझे तुमच्यावर निरतिशय प्रेम आहे यात काहीं शंका नाही. ज्याच्यावर माझे असें हें परमकोटीला पोचलेले प्रेम आहे अशा व्यक्तीशीं जर मी विवाह केला तर परस्परा-च्या प्रीतीच्या प्रचंड ओघांत माझे व्यक्तित्व गटंगळ्या खात शेवटीं नामशेष होऊन जाईल अशी मला भीति वाटतें. म्हणून मी असा निश्चय केला आहे की मी जर कधीं काळीं विवाह केलाच तर ज्या माणसावर माझे निर्विशेष प्रेम जडलेले नाहीं, ज्याच्याविषयीं माझ्या मनांत साध्या स्नेहभावनेवाचून दुसरें काहीही नाही, अशाच माण-साशीं करीन. प्रीतिविवाहात दोन्ही व्यक्ति एकमेकाशी अगदी समरस होऊन गेलेल्या असतात. त्यामुळे दोघापैकी ज्याचें व्यक्तित्व जास्त जोरकस असेल त्याच्या व्यक्तित्वात दुसरीला आपलें व्यक्तित्व मिसळ-वून टाकावे लागतें; नव्हे नकळत ते तसेंच निमज्जन पावतेच. स्वतःचे व्यक्तित्व ज्याप्रमाणें मी गमावण्यास तयार नाहीं त्याप्रमाणें दुसऱ्या कुणाच्या व्यक्तित्वावरही गदा आणण्याची माझी इच्छा नाही. याप्र-

मागे प्रीतिविवाह हा आत्मोन्नतीला बाधक म्हणून मी त्याज्य ठर-
वला आहे."

* * * *

याप्रमाणें माझ्या आयुष्यांतील ते गुलाबी कोडे माझ्या खडतर नशिबाने काळ्या रेघोट्या ओढून नासून टाकलें. मी अलाहाबादला जायचा तेव्हा गेलो. योग्य वेळीं दहाजणांप्रमाणे विवाह होऊन माझा संसारशकट सुरू झाला. उपेचे पुढे काय झाले हें मला कळलें नाहीं व त्याची मी मुद्दाम चौकशी करण्याचाही कधीं प्रयत्न केला नाहीं. माझ्या कल्पनेप्रमाणें माझ्या आयुष्यांतील तो अद्भुतरम्य पण शोकात अंक कायमचा पूर्णविराम पावला होता. त्या प्रसंगाची आजच्यासारखी कधीं काळीं स्मृतीने पुनरावृत्ति होत असे, एवढेंच काय तें. पण अकस्मात् एके दिवशीं माझ्या आयुष्याच्या रंगभूमीच्या पार्श्वभागावरील काळा पडदा बाजूला सरकवला गेला व त्या प्रसं-गाच्या उत्तरार्धाला सुरवात झाली. हाय, हा उत्तरार्ध पूर्वार्धापेक्षांही जास्त कारुण्यपूर्ण व काळजाचा ठाव घेणारा होता, आणि निष्ठुर दैवानें त्यांतील मुख्य अभिनेत्याची भूमिका पार पाडण्याचें माझ्या ललाटीं लिहिलें होते.

* * * *

रविवारचा दिवस. आज कॉलेजला सुट्टी असल्यामुळें सकाळच्या वेळीं मी माझ्या आवडीच्या अवांतर लेखनवाचनांत गढून गेलों होतों. इतक्यात माझ्या गड्याने कोणी भेटावयास आल्याची वर्दी

दिली. हौशीच्या व्यासंगांत आलेला हा व्यत्यय पाहून माझ्या कपा-ळाला आठी चढली. पण माझ्या भिडस्त स्वभावाला कोणाचा तुसडेपणानें हिरमोड करणें जड जाई. मोठ्या नाखुषीने आगंतुकास वर पाठवून देण्यास मी गड्यास सांगितलें. परकी माणसाचा ओझ-रता दृष्टिपातही माझ्या आवडत्या लिखाणावर पडलेला मला सहन होत नसे. म्हणून गडबडीनें टेबलावर पसरलेले कागद गोळा करून ड्रॉअरमध्यें टाकून मी तो बंद करीत असतांच आलेली व्यक्ती त्वरेनें माझ्या खोलींत शिरली व मी उत्थापन देऊन, कांहीं बोलण्या-पूर्वीच कोंपऱ्यांतील एका कोचावर तिने आपले आंग लोटून दिलें. मी चमकून वर पाहिलें, आणि आश्चर्यानें स्तंभीतच झालों. ती उषा होती.

मी उषेला पाहिल्याला जरी पांच-सहा वर्षें होऊन गेली होतीं तरी तिची माझ्या हृदयफलकावर कोरलेली प्रतिमा अगदीं अभंग अस-ल्यामुळें तिला ताबडतोब ओळखणे मला जड गेले नाहीं. तिच्यात म्हणण्यासारखा फारसा फरकही पडला नव्हता. पण त्यावेळीं तिच्या चेहऱ्यावर जो विलक्षण भावनाविर्भाव उमटला होता त्यानें मी भयचकित होऊन गेलों. उषा त्यावेळीं एकाद्या व्याधाच्या रोखलेल्या बाणाचे लक्ष्य बनलेल्या हरिणीप्रमाणें कावरीबावरी दिसत होती. पण तिच्या चेहऱ्यावरचा भाव निव्वळ भयाचा किंवा कातरतेचाही नव्हता. जीविताच्या सरत्या क्षणाच्या निराशेनें बेपर्वा होऊन, जीवावर उठ-लेल्या शिकाऱ्यावर लगोलग उलटून उडी घालूं पाहणाऱ्या एकाद्या

वाघिणीप्रमाणें ती उन्मादिनी दिसत होती. आतां आम्हा दोघांचीं हृदयें जरी दीर्घकाल दूरस्थता व दुर्दम्य परिस्थिति यांनीं विलग झालीं होतीं तरी एक काळ असा होता कीं ज्यावेळी आम्हां दोघांच्या शरीरांत एकाच तऱ्हेचें मन संकल्पविकल्पाचा खेळ खेळत होतें. त्यामुळें उषेच्या एकंदर आविर्भावावरून मी ताबडतोब ओळखले कीं उषा त्यावेळी आपल्या आयुष्यांतील अत्यंत गुतागुंतीच्या व बिकट अशा खंडाशीं येऊन ठेपली आहे. या आणीबाणीच्या प्रसंगां-तून एकाकी मार्ग काढण्यास असमर्थ असल्यामुळे ती कावरीबावरी झाली आहे. मात्र या संकटांतून पार पडण्याचा एक मार्ग तिला सुचला असून अनन्यगतिकत्वामुळें त्या विलक्षण भासणाऱ्या मार्गा-चाही अंगीकार करण्यास धैर्यानें ती सज्ज झाली आहे. या सर्व भावनांच्या पृथक्करणानें माझ्या हृदयांतही ज्या भावना हळुंहळूं उठूं लागल्या त्यायोगाने व उषेच्या माझ्यावर खिळलेल्या विलक्षण तेजानें लकाकणाऱ्या, हृदयभेदी नजरेनें माझें मस्तक भ्रमण करूं लागलें व चित्त कावरेंबावरें झालें.

" विभाकर " विलक्षण शात व संथ स्वराने उषा बोलूं लागली, " ओळखलंतना मला ? फार आश्चर्य वाटत असेल नाहीं तुम्हाला मला अशी अकस्मात् आलेली पाहून ? "

" हो, आश्चर्य तर खरंच ", तिला इतक्या शांतपणें बोलतांना पाहून मीही माझ्या साश्चर्य कुतूहलाचा आवेग दाबून ठेऊन शक्य तितक्या स्थिरपणें म्हणालों, " गेलीं पांचसहा वर्षें तुमचा कांहींच

ठावठिकाणा नव्हता मला."

"कसा असणार?" उषा सस्मित म्हणाली, "मी कांहीं तुमच्यासारखी उभ्या हिंदुस्थानांत प्रसिद्धी पावलेली शास्त्रज्ञ शोधक थोडीच आहे माझ्या हालचालीची बित्तंबातमी जगजाहीर होण्याला?"

तिच्या त्या स्तुतिपर थट्टेच्या उद्गारांनीं माझ्या हृदयाला गोड गुदगुल्या होण्याऐवजीं एकादे तीक्ष्ण पातीचें हत्यार कोणी हृदयांत हळुंहळू पण नेटानें खुपशीत जावें त्याप्रमाणें त्याला मर्मांतिक वेदना होऊं लागल्या. कारण तिच्या त्या अर्धवट थट्टेत, अर्धवट मनःपूर्वक असें बोलण्याच्या विशिष्ट पद्धतीमुळें, तिच्या त्या गोड, कावेबाज स्मितामुळें व तिच्या त्या एवढ्याशा बोलण्यातही व्यक्त होणाऱ्या माझ्या-विषयींच्या साभिमान कौतुक व आपलेपणा या भावनामुळे सहा वर्षां-पूर्वींचें माझे जीवन माझ्या डोळ्यापुढें मूर्तिमंत उभें राहिलें. अहाहा, सहा वर्षांपूर्वी उषेच्या मोहक उद्बोधक सहवासांत घालवलेला तो लोभनीय काल—माझ्या आयुष्यातील उर्वरित साऱ्या वर्षांचे मोल देऊनसुद्धा तो व्यतीत काल मला पुन्हा लाभण्याजोगा नाहींना! मनश्चक्षूंसमोर प्रगट झालेल्या त्या आकर्षक दृश्यावरून नजर काढून मी माझ्या-समोर बसलेल्या उषेकडे पाहिले. पण तिच्या प्रत्यक्ष दर्शनानें गत-सौख्याबद्दलचा खेद व तिच्या सहवासाबद्दल उत्कंठा दुणावण्या-ऐवजीं उलट उषेविषयीं माझ्या मनात एक प्रकारची रोषपूर्ण छटा उद्भवली आहे असें मला आढळलें. माझ्या आयुष्यांतला तो सारा आनंद हरपण्याचें कारण कांहीं एकादी मानव प्रयत्नाला दुर्लंघनीय

अशी दैवाची घटना नव्हती! माझ्या आयुष्याचा असा खेळखंडोबा उषेच्या हेकेखोरपणानें व तिच्या त्या लोकविलक्षण तत्त्वज्ञानानेंच केला नव्हता कां? अलाहाबादेला आल्यानंतर एकदोन वर्षें उषेची माझ्याशीं वागणूक व तिचें विशिष्ट तत्त्वज्ञान याचें चिकित्सकदृष्ट्या मी पुष्कळ मनन केलें होतें. पण तेव्हां जसा तिचा युक्तिवाद मला पटला नव्हता तशीच नंतरही त्याची सयुक्तता माझ्या प्रत्ययास आली नाहीं. जगाच्या धकाधकीच्या कष्टदायक मामल्यांत आपल्या स्वतःच्या व्यक्तित्वाच्या अभिनिवेशाने झुंजत बसण्यापेक्षा, आपलें व्यक्तित्व दुसऱ्या एकाद्या समानशील प्रिय व्यक्तित्वात मिसळून टाकून, स्वत्वाचा अहंकार गळून गेल्यानंतर, जीविताचा निर्भेळ आनंद सुखालस्यात चाखीत पडणें, यांतच शाश्वत, निव्वळ सुखाची प्राप्ति होईल, अशी माझी पूर्ण विचारांतीं विचारसरणी बनली होती. अर्थात् या सिद्धांताचे तथ्य स्वानुभवानें मला पटून आलें नव्हतें. संपूर्ण आत्मसमर्पणाने लाभणारा निर्भेळ जीवनानंद चाखण्याचें माझ्या ललाटी लिहिलेलें नव्हतें. तसल्या सुखप्राप्तीसाठीं पुढें सरसावलेले माझें आतुर हृदय त्याच्या एकमेव आश्रयस्थानाने लाथाडल्यामुळें कायमचें घायाळ होऊन माझ्या शरीराच्या तुरुंगांत कोंडून पडले होतें. पण आत्यंतिक स्वरूपाच्या आत्मदानानें नितराम् सुखावलेल्या, माझ्या जीवनाशीं निगडित झालेल्या दुसऱ्या एका जीवाचा जीवनक्रम नित्य पाहून माझ्या त्या सिद्धाताला क्षणोक्षणीं पुष्टि मिळत गेली होती. तें परमावधीचें निरामय सुख आपल्याच व्यक्तित्वाला हृदयाशीं

कवटाळून बसण्याचा हट्ट घेतलेल्या या उषेला लाभलें आहे काय? खात्रीनें नाहीं. माझ्यासमोर बसलेली उषा म्हणजे जगांतल्या टक्के-टोणप्यांनीं दुखावला जाऊन निर्वेध सुखांशाचा शोध करीत भटकत असलेला एक निराधार, बापुडवाणा जीव होता. आपल्या सिद्धांताला हा ताजा पुरावा मिळालेला पाहून एक प्रकारची विजयानंदाची छटा माझ्या अंतःकरणांत चमकली; पण दुसऱ्याच क्षणीं दुर्दैवी उषेचें दुःख पाहून हर्ष पावणाऱ्या माझ्या अश्मवत् कठोर हृदयाची मला शरम वाटूं लागली.

या भावनांच्या हलकल्लोळांत मौन स्वीकारून उषेपुढें मी किती वेळ बसलों होतों याचे मला भान नव्हतें. उषाही थट्टेचा तो एक उद्गार काढून पुन्हां आपल्या जीवनवृत्तांताच्या स्मरणानें गंभीर होऊन, आपण ज्या कामासाठीं येथें आलों त्याचा प्रस्ताव कसा करावा याचें जणूं काय चिंतन करीत आपल्या किंचित् वळवलेल्या व उभ्या बाहूवर सावरलेल्या तळहातावर आपली हनुवटी टेंकून कितीतरी वेळ स्तब्ध बसली होती. थोडया वेळानें विचार सुव्यवस्थित झाल्याप्रमाणें तिनें मान वर उचलली व आपले विचार माझ्यापुढें सुसंगत मांडण्यास सुरुवात केली.

“ विभाकर, तुमच्यावांचून ज्याच्यापाशीं आपलें हृदय निर्धास्त-पणें उकलून दाखवावें असें माझ्या जिव्हाळ्याचें जगांत दुसरें कोणी नाहीं. आतांची गोष्ट निराळी पडते. जिवाभावाच्या गोष्टी खरा स्नेह-भाव बाळगणाऱ्या माणसापाशींच बोलतां येतात. ”

उषेच्या हृदयातून एक जड निश्वास तिच्या नकळत बाहेर पडला. माझ्याविषयींचा तिचा तो विश्वस्त स्नेहभाव पाहून माझेंही हृदय भरून आलें.

" विभाकर " उषा पुढे बोलूं लागली. " म्हणूनच आज मी तुमच्याकडे जिवाचा आटापिटा करून आलें आहे. माझ्या मधल्या पांचसहा वर्षांच्या आयुष्याचा इतिहास तुम्हाला मी विस्तारानें सांगितलाच पाहिजे असें नाहीं. तुम्ही चतुर आहांत. माझा विवाह झाला आहे खरा—

ही गोष्ट तर्कानें जरी मी उषेला पाहिल्याबरोबरच ओळखली होती तरी ती अशी स्पष्टपणें उषेकडूनच उच्चारली गेल्याबरोबर माझें हृदय आंदोलल्याशिवाय राहिलें नाहीं. वाढत्या कुतूहलानें मी उषेची हकीकत ऐकूं लागलों.

" पण मगाशीं तुमच्याशिवाय माझें खरें जिव्हाळ्याचें जगांत कोणी नाहीं असें मी म्हटलें तेव्हांच विवाहापासून अपेक्षित सुखाचा लाभ मला झालेला नाहीं, हें तुम्ही जाणलेंच असेल. विभाकर, मी माझ्या संसारांत सुखी नाहीं आणि पुढेंही या हल्लींच्या संसारांत सुख लाभेल अशी मला तिळमात्र आशा नाहीं. कारण—पण त्याचीं कारणें किती आणि कशी सांगू मी तुम्हांला ? लग्नापूर्वीच्या वाढत्या स्नेहाचा व लग्नानंतरच्या एकत्र जीवनाचा मिळून तीनचार वर्षांचा प्रथमदृष्ट्या क्षुल्लक भासणाऱ्या पण परिणामीं अत्यंत महत्त्वाच्या अशा अनेक प्रसंगांत गुंतलेल्या माझ्या संसाराचा इतिहास उलगडून

कुठवर दाखवीत बसूं मी तुम्हांला ! थोडक्यांत सांगते, माझ्या विवाहाच्या बाबतींत मी फसली गेलें; माझी निवड सपशेल चुकली. संकटांत सावली, जगाशीं झगडण्याला आधार म्हणून ज्या निर्भेळ स्नेहाची मी विवाहापासून अपेक्षा करीत होतें तो स्नेह, ती जोड मला माझ्या विवाहापासून लाभणें शक्य नाही हे माझ्या मनावर हळुंहळूं अनेक प्रसंगानी बिंबू लागलें. मला विवाहापूर्वी जो निर्हेतुक, चिरंतन स्वरूपाचा स्नेह वाटला तो निव्वळ स्वार्थी, क्षणिक, वैषयिक स्वरूपाचा विकार ठरला. माझे जीवित व्यर्थ खर्ची पडूं लागलें. माझा आयुष्याचा डाव कुजत चालला; आणि मी कष्टी झाले. परिस्थितीखालीं चेंगरलेल्या कित्येक मूळच्या कार्यक्षम स्त्रियांचें जीवित असें फुकट जात असेल. पण अशी दहाजणींसारखी परिस्थितीची दासी बनून राहण्याला माझे मन तयार होईना. म्हणून, तात्पुरती का होईना माझ्या सभोवतालच्या संसाराची कोंडी फोडून मी बाहेर पडलें आहे; आणि तुमच्यापाशीं ही सगळी कहाणी सांगून माझ्या जन्माच्या रोगावर उपाययोजना विचारण्यासाठीं मी तुमच्याकडे आज आलें आहे. "

अत्यंत गंभीर, शात स्वरानें उषा हे सगळें बोलत होती. तिच्या आवाजावरून तिच्या मनात चाललेल्या खळबळीची कोणालाही शंकासुद्धां आली नसती; पण सगळें बोलून झाल्यावर तिने माझ्याकडे रोखून जो एक दृष्टिपात टाकला त्यांत तिचें सारें हृदयींचें खरें हितगुज ओतले गेलें होतें. माझ्याकडे लागलेल्या तिच्या त्या कांहींशा

उत्सुक, कांहींशा कातर व कारुण्यपूर्ण नजरेवरून साध्या शाब्दिक सल्ल्यापेक्षां कांहींतरी जास्त ती माझ्यापासून अपेक्षित आहे अशी मला शंका येऊं लागली व त्या कल्पनेनें माझें हृदय अत्यंत व्याकुळ झालें व मन बावरून गेले. उषेने मला केवढा पेच घातला होता हा! तिच्या जीवनाची विस्कटलेली घडी पुन्हा ठाकठिकीनें बसवण्या-साठीं मी काय करावें अशी इच्छा होती तिची? या प्रश्नाचें उत्तर जसें तिच्या त्या आशापूर्ण नजरेंत अत्यंत सूक्ष्म रीतीनें सूचित झाले होतें, तसेंच ते माझ्या हृदयांतही चोरट्या पावलांनी उमटूं पहात होतें. पण माझी कर्तव्यकठोर बुद्धि त्या चोरट्या चाहुलीनें दचकून खडबडून जागृत झाली व त्या घातकी विचाराची अनधिकृत सावलीही माझ्या हृदयावर पडूं नये म्हणून जपणुकीस बसली. न्यायनिष्ठुर काटे-कोरपणाने उपस्थित प्रश्नाचीं सारीं साधकबाधक प्रमाणें तिनें माझ्यापुढे मांडली व उपहासपूर्ण स्वरानें ती मला पुन्हां पुन्हां विचारूं लागली, "तुझ्या व्यक्तित्वांत विश्वस्त प्रेमळपणानें ज्या निरागस, कोमल बालिकेनें आपलें सर्वस्वीं आत्मदान केलें त्या बालिकेच्या आशा आकांक्षावर निखारे ठेऊन तुझी व आपली जीवनज्योति तूं पुन्हा प्रज्वलित करावीस, अशी का तुझ्या या उषेची अपेक्षा आहे? त असें करण्यास तयार झालास तर देवाच्या दरबारीं तूं शेवटीं घोर अपराधी ठरून एका अमोल जीवनाच्या नाशाबद्दल तुला जाब द्यावा लागेल यांत कांहीं शंका नाहीं! पण शिवाय तूं असा विचार क कीं उषेला,—अनेक वर्षांच्या जागरूक जोपासनेनें जगवलेल्या दिव्य

प्रेमांकुराला, त्याला अत्यंत जरूर असें आत्मदानाच खत घालण्याचें नाकारून, उलट आपल्या व्यक्तित्त्वाला वाव देण्यासाठीं तो उखडून टाकणाऱ्या निर्दय उषेला, तुझ्यापासून तुझ्या उभ्या आयुष्याचें बलिदान मागण्याचा कांहींतरी हक्क पोंचतो काय ? तुझें सारें आयुष्य, तुझ्या साऱ्या शक्ति तुझ्या पत्नीसाठींच वेंचल्या जाव्या, हेंच उचित नाहीं काय ? तुझें हृदय तुझ्या पत्नीला देणें तुला शक्य नाहीं, तर ते खुशाल तूं आपल्यापाशीं ठेव किंवा तुझ्या उषेच्या मागोमाग त्याला जाऊं दे; पण बाकीचें तुझें सगळें सर्वस्व तुझ्या पत्नीच्या हातीं, तिच्या निर्विशेष आत्मदानाची अल्पस्वल्प परतफेड म्हणून, तुला निरविलेंच पाहिजे." माझ्या बुद्धीचा, त्यावेळीं मला अत्यंत कठोर भासणारा पण परिणामीं सर्वथैव योग्य ठरणारा, हा निवाडा माझ्या व्याकुळ हृदयाला नाखुषीनें पण निमुटपणें मान्य करावा लागला. मी उषेसाठीं कांहींही करणे न्याय्य नव्हतें व तसें तिला स्पष्टपणें जाणवणे माझें कर्तव्य होतें.

"उषे," तिनें जितक्या शांत व तयस्थ वृत्तीनें मला सल्ला विचारला होता तितक्याच संथपणें मी म्हणालों, "मी काय बरं सांगू शकणार तुला ? आयुष्यांतले हे नाजुक व गुंतागुंतीचे प्रश्न ज्याचे त्यानेंच सोडवावयाचे असतात. किती जरी जिव्हाळ्याचा असला तरी जाणून बुजून त्रयस्थ असा माझ्यासारखा माणस अशा प्रसंगीं काय करणार ! फार, फार तर मायेच्या शब्दानें, सहानुभूतीच्या ओलाव्यानें तो

आपल्या कष्टी सुहृदाचें दुःख तात्पुरतें कमी कष्टदायक भासवील, यापलीकडे काय!"

माझ्या उत्तरांतील तटस्थ तिऱ्हाईत वृत्ति उषेच्या हृदयाला किती झोंबली असेल याची कल्पना माझ्या स्वतःच्या तळमळणाऱ्या हृदयावरून मला चांगलीच करता येत होती. पण मी असें उत्तर का दिलें हें उषेच्या ध्यानात आलें असेल ना? माझी तटस्थ वृत्ति ही तिच्या पूर्वीच्या स्वत्वाच्या अभिमानाची प्रतिक्रिया असें उषा उमजली नसेल कां? कां परस्परामधील पूर्वीचा मुग्धमधुर प्रीतिभाव मी कायमचा माझ्या अंतःकरणांतून कधींच पुसून काढला आहे, असें तिला वाटलें असेल? माझ्या मनोभावना, माझा तर्कवाद जास्त स्पष्ट करून सांगण्याची जरूरी होती कां? पण माझेंच मन इतकें गोंधळून गेलें होतें व भिन्नविभिन्न भावनांच्या झगड्याने इतकें हुळहुळें झालें होतें कीं मी बोललों यापेक्षां जास्त कांहीं बोलणे, मनांत आणलें तरी मला शक्य झालें नसते.

उषेच्या मनांत कांहींही कालवाकालव झाली असो, बाहेरून तिनें एक फक्त दीर्घ उसासा टाकला व विषण्णपणें हंसून ती म्हणाली, "खरंच तें विभाकर. तुमच्याकडे येऊन असल्या बाबतींत सल्ला विचारण्यांत माझा थोडा वेडेपणाच झाला नाहीं! पण जाऊं द्या तें. सर्व हकीकत मोकळेपणीं तुमच्यापाशीं सांगितल्यामुळें माझ्या अंतःकरणावरचें ओझें बरेंच हलकें झालें, हें काय थोडें झालें!"

दुर्दैवी बिचारी माझी उषा! माझ्यापाशीं हृदय मोकळें केल्या

नंतर तें हलके झाले कीं पुन्हा जास्तच जड झालें, तिच्या जीवालाच काय तें ठाऊक. त्यानंतर पुन्हां कधींही उषा माझ्या नजरेस पडली नाहीं किंवा तिच्याविषयीं कांहीं माहितीही चुकूनसुद्धां माझ्या कानीं आली नाहीं, एवढे मात्र खरें !